परमपूज्य

श्री सिध्देश्वर महास्वामीजींची प्रवचने

# भक्ति योग



संग्रह (कन्नड)

डॉ. श्रध्दानंद स्वामीजी

भावानुवाद

प्रा. श्रीकांत अरळी

ज्ञानयोग फाउंडेशन, ज्ञानयोगाश्रम, विजापुर.

परमपूज्य **श्री. सिध्देश्वर स्वामीजींची**

प्रवचनें

# भक्ति योग

## प्रवचने

संपादन (कन्नड) : डॉ. श्रध्दानंद स्वामीजी

भावानुवाद : प्रा. श्रीकांत अरळी.

ज्ञान योग फाउंडेशन

ज्ञान योगाश्रम विजापुर.

BHAKTI YOGA : Spiritual discourses by
Shri. Siddheshwar Swamiji, Jnana Yogashram Bijapur.
Published by Dnyan yoga Foundation,
Dnyan yogashram Bijapur.

First Edition : 2000



Price : Rs. 50/-



*Printed by :*

Shri. Durudundeeshwar Offset
Printers, Sankeshwar.
Dist : Belgaum :
Ph : 73504

ॐ

॥ श्री शिवरात्रीश्वराय नमः ॥

जगदगुरू श्री. शिवरात्रि देशिकेंद्र महास्वामीजी महाराज

जगद्‌गुरू श्री. वीरसिंहासन मठ, सुत्तूर, तालुका नंजनगुड्ड

*********

जगद्गुरू श्री शिवारात्रीश्वर मठ म्हैसूर ५७००४

# हार्दिक शुभेच्छा !

भगवंताचा साक्षात्कार करून घेण्याला भक्ती हे अनन्य साधन होय ! निष्कल्मश प्रेमाने देवाची आराधना करण्याचा हा उपासना मार्ग अत्यंत सोपा, सरळ, सहज ! परम श्रध्दा, निष्ठा यांचा अनुपम संकेत असा हा भक्तिमार्ग ! यांत कोणत्याही सिध्दांताचे विश्लेषण नाही. तार्किक प्रदर्शनांचे आडंबर नाही. सामान्य साधकाला भगवच्चिंतनांत सहभागी होण्याची संधि उपलब्ध करून देणारा उत्तम योग म्हणजे भक्तियोगच होय ! परमात्म प्राप्तीसाठीं तळमळणाऱ्या भक्ताला हा अत्यंत साधा-सरळ मार्ग । चित्शुध्दीने आत्मप्रभेची दिव्य कांति प्रकाशण्यासाठी भक्ति योग अति सहकारी ।

भक्ताचे मन अढळ ! दृढ निर्धाराचे एकमेव अप्रतिम आत्मनिवेदन ! उद्वेग, प्रक्षुब्धता यांनी विचलित न होणारी मनोवृत्ति, त्यामुळे सानुनय, निर्भीत, निरालंब भक्तीचा साधक सुध्दां एका अर्थाने नित्य तृप्त ! त्याचे जीवन सोप्या आणि सरळ भाषेंत समजावून देण्याच्या दिशेंत भक्तियोग ही कृति सहकारी !

भक्तियोग ही कृति विजापूरच्या ज्ञानयोगाश्रमाच्या श्री. सिध्देश्वर स्वामीजीनी सुत्तूर येथे १९९५ साली केलेल्या आध्यात्मिक प्रवचनांचा सारसंग्रह ! स्वामीजी उदात्त चिंतनशील, सुसंकृत अनुभवी संत ! अत्युत्तम

वाक्पटु ! आपल्या अनुभावपूर्ण प्रवचनांद्वारे कर्नाटक व महाराष्ट्रांतील जनमानसांत विशिष्ट स्थान मिळविणारे निराभारी चरमूर्ति ! आपल्या वाणीने-वागण्याने, सामाजिक कळकळी मुळे सकलदर्शन प्रतिभेने अनुभाव जगतांत अत्यंत गौरव-आदर यांना पात्र झाले आहेत!

श्री. सिध्देश्वर स्वामीजींची अनुभावपूर्ण प्रसाद वाणी सभासंमेलनात तदेक चित्ताने ऐकायला हजारो श्रोते आतुर झालेले असतात. त्यांची वाणी मधाप्रमाणे गोड. भाव-दिव्य ! देव भाव ! त्यांच्या अनुभवाचा सरळ, सुंदर उपदेश श्रोत्यांच्या हृदयांत खोलवर उमटतो. अशी ती तेजस्वी सत्वपूर्ण वाणी !

श्री सिध्देश्वर स्वामीजींच्या प्रवचनांचा संग्रह त्यांना संमत होईल अशा रीतीने डॉ. श्रध्दानंद स्वामीजीनी अत्यंत श्रध्देने केला आहे.

ही कृति कन्नड भाषाभिमानी वाचकांना आत्मीयतेने स्वीकार करावीशी वाटो ! श्रींच्या प्रवचनांची आणरवी अनेक पुस्तके प्रकाशित होवोत हीच इच्छा !

६ जनेवरी, १९९९.

# प्रस्तावना

भगवद्दर्शनासाठीं अनेक मार्ग आहेत. त्यांपैकी भक्तियोग हा सरळ, सुंदर. या विषयावर सुत्तूर क्षेत्रांत गुरूदेव श्री सिध्देश्वर स्वामीजीनी प्रवचन केले. त्या प्रवचनामृताचा लहानसा कुंभ म्हणजे ही कृति.

श्री सुत्तूर मठ प्रख्यात धर्मपीठ असून राष्ट्राच्या शैक्षणिक, सामाजिक, धार्मिक क्षेत्रांत या पीठाने गणनीय सेवा केली आहे. या श्री मठाचे पीठाधिपति जगद्गुरू पूज्य श्री. शिवरात्री देशिकेंद्र महास्वामी महाराज व पूज्य श्री सिध्देश्वर स्वामीजींचे आध्यात्मिक सहृदय स्नेह संबंध अनेक वर्षांपासून दृढ होत चालले आहेत.

'श्री' नी सुमारे पांचशेहे पृष्टांची भक्ति योग प्रवचनाची टंकलिखित प्रत माझ्या हातीं सोपविली. सुमारे दीडशेहे पृष्टां मध्ये त्या प्रतीची संक्षिप्त आवृत्ति तयार केली. गुरूदेव श्री सिध्देश्वर स्वामीजीनी हस्तलिखित प्रतीचे परिशीलन करून या कृतिला सुंदर रूप प्रदान केले.

'भक्तियोग' हे पुस्तकाचे नांव वाचून, तो साधा सरळ व सोपा असेल असे वाटते. पण पूज्य श्री. गुरूदेवांच्या गंभीर व्यापक अनुभव विचार तरंगांचे संपादन करणें अत्यंत कठिण काम ! त्यामुळें या कृतिमध्यें कांही त्रुटि अथवा दोष आढळून आले तर ते माझ्या निदर्शनाला आणून द्यावेत, ही विनंती.

या पुस्तकांत सकल जीवराशींच्या हृदयांत असणारे सामान्य प्रेमच परम प्रेम होऊन भक्तीचे रूप कसे धारण करते ? याचें हृदयंगम वर्णन आहे.

विश्वाच्या अनेक संतांनी या पवित्र प्रेममय परिमळाचा सुगंध आपल्या वाणींतून-वागण्यातून प्रकट केला आहे.

श्री. सुत्तूर जगद्गुरूनी गुरूदेव श्री सिध्देश्वर स्वामीजींची प्रसादवाणी पुस्तक रूपाने वाचकांना उपलब्ध करून दिली आहे. गुरूदेवांची ही वाक्गंगा विश्वभर पसरून 'दुरितांचे तिमिर जाओ', हीच प्रार्थना !

या कृतीचे परिष्करण कार्य एक्संबा येथील श्री. शिवयोग मठ, टाकळी आणि कागवाड येथील गुरूदेव श्री मल्लिकार्जुन आश्रम व म्हैसूर येथील सुत्तूर मठांत संपन्न झाले. या कार्याला सहकार्य दिल्याबद्दल ज्ञानयोगाश्रम व सुत्तूर मठांतील सकल श्री' ना धन्यवाद !

श्री. शिवरात्रीश्वर ग्रंथ मालेंत रात्रंदिवस काम करणाऱ्या सर्वांना व श्री मठाच्या धर्म-ज्ञान प्रसारांत संपूर्णपणें स्वतःला वाहून घेणाऱ्या सर्वांना हृत्पूर्वक वंदन ! या भक्तिमंदिरांत सहृदय वाचकाचे सविनय स्वागत !

डॉ. श्रध्दानंद स्वामीजी,
श्री. गुरूदेवाश्रम, कागवाड.

# अनुवादकाचे दोन शब्द !

बुध्द-बसव-गांधी परंपरेंतील आधुनिक काळांतील शिवशरण संत लिंगैक्य श्री. मल्लिकार्जुन महास्वामीजी व त्यांचे शिष्य पूज्य श्री. सिध्देश्वर स्वामीजीनी कर्नाटक व महाराष्ट्रांत सतत संचार करून अज्ञानांधकारांत तळमळणाऱ्या जीवांना अध्यात्माचा प्रकाशमय - आनंदमय मार्ग दाखविला.

श्रींच्या उपदेशांत वेद-आगम-उपनिषद-भगवद्गीता, योगसूत्र, ब्रह्मसूत्र, व वचनशास्त्र सार सामावलेले आहे. कन्नड भाषेंतील हा अमृत कलश मराठी भाषिकांना उपलब्ध करून देण्याचा हा अल्प-प्रयत्न ! कन्नड भाषेंतील अध्यात्मिक शब्दांना मराठींत व्यक्त करण्यास माझी अल्पमति कुंठित झाली आहे. तथापि गगनाला गवसणी घालण्याची जिद्द मनांत बाळगून जनता जनार्दनाचे चरणीं अर्पिलेली ही सेवा गोड मानून घ्याल अशी आशा आहे.

प्राचार्य - श्रीकांत अरळी, संकेश्वर.

फार्म हाउस,
कणगला - ५९१२२५
जि. बेळगांव.

## विषयानुक्रम पृष्ठ

# - १ -
# योग

योग म्हणजे मिलन. भेट ! दोन वेगवेगळ्या वस्तु अथवा व्यक्ति एक होणें म्हणजे योग ! उदा. सति-पति. जीवात्मा-परमात्मा.

प्रापंचिक वस्तूंचा योग झाल्याने क्षणिक सुख लाभते.

पारमार्थिक योग म्हणजे परम सत्य जाणून, अनुभव घेऊन, आनंद प्राप्त करून घेणे. परमसत्य वस्तूच्या योगाने परमानंद, शाश्वत सुख, शांति, समाधान लाभते.

येथे एक फूल आहे. डोळे त्या सुंदर फुलाला पाहतात. पाहिलेल्या फुलामध्यें मन गुंतते. सौंदर्य अनुभवते. आनंद मिळविते.

फूल डोळ्यांना दिसते. हाती गवसते. त्या फुलाचा योग सहज. त्याचप्रमाणें कोणत्याही भौतिक वस्तूचा योग सुलभ, सहज! अगम्य, अगोचर अशा आत्मा-परमात्म्याचा योग होण्यास साधनेची आवश्यकता आहे.

जीवाने देह भाव विसरून देवाचे स्मरण करीत त्याच्या ठिकाणींच समरस व्हावे. अशाप्रकारें देह आणि देहाला संबंधित सकल प्रपंचाला क्षणभर विसरून देवाचे स्मरण करणें हीच भक्ति ! स्मरण करीत असलेल्या देवामध्यें आपले मन एक करणें-समरस होणें हाच योग ! हाच भक्ति योग !

# - २ -

# प्रेम रसायन

जगांतील सर्व परम अनुभावि संत भक्ति विषयीं बोलतात. सर्व लोक त्यांचे बोलणे आदर पूर्वक ऐकतात. संताची वाणी ही विद्वज्जड नव्हे. ह्रदयापासून निघालेले हे बोल. त्या बोलण्यांत माधुर्य आहे. आकर्षण अगहे. नि: शब्द ब्रह्माविषयीं संतांच्या-शरणांच्या ह्रदयांतून प्रस्फुटित झालेली अमृत वाणी. त्या मधुर, अमृत वाणीच्या श्रवणाने आपले ह्रदय शुध्द होते. मन शांत होते.

आपले जीवन समस्यांनी भरलेले आहे. समस्या कोणाला चुकल्या आहेत ? इंग्लडंचा युवराज चार्ल्स आणि युवराज्ञी डायना यांना सुध्दा समस्या. अमेरिकेचे अध्यक्ष क्लिंटन सारख्या जगांतील सर्व शक्तिमान सर्वाधिकाऱ्याला सुध्दा समस्यांना सामोरे जाणें चुकले नाही. कोणत्याही देशाचा राजा असो वा प्रजा असो; मानव प्राण्याला समस्या चुकल्या नाहींत. शांती लाभत नाही. या समस्यांचा परिहार कसा होईल ? संतांच्या अमृतवाणींतच मानवांच्या सर्व समस्यांचा परिहार होतो. भक्ति मार्गानेच त्याला शांति-समाधान.

सर्व धर्मांमध्यें भगवद् भक्ति सांगितली आहे. सर्व योगी भक्ति मार्ग सांगतात. एका धर्माचे, एका पंथाचे लोक दुसऱ्या धर्माला अथवा

पंथाला आवडणार नाहींत. पण भक्ती विषयीं कोणाचे दुमत नाही. मूल कोणाचीही आज्ञा पाळणार नाही. सांगितलेले ऐकणार नाही. पण मातेची अवज्ञा करणार नाही. मातेचे वात्सल्यपूर्ण बोलणे ऐकून घेतल्याशिवाय राहणार नाही. प्रेमाला भाषेचे बंधन नाही. सारे जग प्रेमाची भाषा समजूं शकते. परम प्रेम रूप भक्ति विश्वमान्य होय !

कोणतेही शास्त्र श्रवण करण्यास सुध्दां अर्हता असावी लागते. पार्श्वभूमि तयार असली पाहिजे. मातेचे अंगाई गीत ऐकण्यास बाळाला कसल्या पार्श्वभूमीची आवश्यकता असते ? परिशुध्द प्रेमभरित भक्तीचे बोल ऐकण्याची उत्कट अभिलाषा असली कीं पुरे !

दिवसभर राबून थकलेल्या माणसाला जशी विश्रांती आणि झोप ही आवश्यक असते. तसेंच संसारांत अनेक समस्या सोडवितांना थकल्या-भागल्या जनांना भक्तीही तितकीच आवश्यक. भक्ति म्हणजे योग निद्रा ! निद्रेला जाति, मत, पंथ, गरीब, श्रीमंत असा भेद नाही. आत्मशांति देणाऱ्या भक्तीमध्यें सुध्दां कांही भेद नाही.

पाणी जोपर्यंत मिळते; तोपर्यंत संग्रह करून ठेवल्यास, तहान लागली कीं ती भागवूं शकतो. अनुभावि-साधु-संत यांचा समागम जेव्हां होतो, तेव्हां त्यांची मधुर वाणी श्रवण करावी. आपणांस जेव्हां त्यांच्या उपदेशाची आवश्यकता वाटते तेव्हां त्या उपदेशाचे स्मरण करून-ध्यान करून प्रशांति मिळविता येते. कोकिळा वसंत ऋतूंतच गाते. ती जेव्हां गाते, तेव्हांच ते गीत ऐकून आनंद मिळवावा. संत-महात्मे, अध्यात्म कोकिळा होत. त्यांची मधुर वाणी-अमृत वाणी सर्व ऋतूंमध्ये आपण ऐकूं शकतो. त्याला काळ-वेळ यांचे बंधन नाही.

एक होता अनुभावि गुरू. त्याच्यापाशी एक माणूस आला. तो मोठा श्रीमंत होता. त्याचे वय पन्नास वर्षांचे होते. गुरूंना वंदन करून तो म्हणाला,

''गुरु महाराज ! देवाच्या दयेने मी भरपूर धन संपादन केले आहे. माझ्या कुटुंबातील सर्वजण सुखांत आहेत. आतां मला देवाचे दर्शन घ्यायची इच्छा झाली आहे. मला एखादा सरळ आणि सोपा उपाय सांगा. ती साधना केव्हां करावी ? हे ही सांगा !''

त्या धनिकाची आतुरता पाहून गुरु महाराज म्हणाले, ''देवाचे दर्शन घडण्यास एक फारच सोपी साधना आहे. मरण्यापूर्वी एकदां मन:पूर्वक देवाचे स्मरण कर ! पुरे ! त्याच क्षणीं तो तुझ्या अनुभवाला येईल.''

''मरण्यापूर्वी एकदां देवाचे स्मरण करायचे ना ? मला आतां कोठे पन्नास वर्षे झाली आहेत. अजून खूप अवकाश आहे !'' धनिक म्हणाला. संतोषाने गुरूंना वंदन करून तो घरी जायला निघाला.

''थांब ! केव्हां देवाचे स्मरण करशील ?'' गुरूने विचारले.

''गुरु महाराज ! ते विचारायला विसरलोच. माझे मरण केव्हां आहे बरे ?'' धनिक म्हणाला.

''माझे मरण केव्हां आहे ? तेच मला माहित नाही. तर मग तुझे मरण मला काय माहित ? तूं आजच मरशील; किंवा आणखी पन्नास वर्षांनंतर मरशील. हे जीवन अनिश्चित आहे. आतां तू लौकर शहाणा

हो. आज उद्याच तुला प्राण सोडावे लागतील असे समजून आजच नव्हे आतांच तूं देवाचे स्मरण करून धन्य हो !'' गुरु महाराज म्हणाले.

त्या धनिकाचे डोळे उघडले. ''भक्ति साम्राज्यांत प्रवेश करायचा क्षण हाच !'' हे ओळखून तो धन्य झाला.

परम प्रेमभरित हा भक्तियोग सरळ, सुंदर, सरस ! या प्रेमाचा तिरस्कार करून द्वेषाचा पुरस्कार करणारा एक सुध्दां संत या जगांत नाही. जगाच्या सर्व संतांच्या उपदेशांत हा प्रेमरस स्त्रवतो.

''दयेवीण धर्म तो कोणता ?'' असे महात्मा बसवेश्वर म्हणतात. ''तुझ्या शेजाऱ्यांवर स्वत: प्रमाणेंच प्रेम कर.'' येशू ख्रिस्त म्हणतो. ''अहिंसा परमोधर्म: ।'' महावीर म्हणतात.

सर्व पशुपक्षी आपले मित्र !'' सेंट फ्रान्सिस '' म्हणतो.

अशाप्रकारे देश-विदेशाच्या सर्व संत महंतांनी परम प्रेमरुपी भक्तीचा पुरस्कार ह्रदयत: केला आहे. आचार्य शंकरांनी सुध्दां अद्वैत मताचा पुरस्कार केला असला तरी शेवटीं,

*''भज गोविंदं, गोविंदं भज मूढमते*
*नहि नहि रक्षति डुकुऋंकरणे ।''*

असे म्हणत भक्तीचाच पुरस्कार केला.

प्रेमरसांत सदैव डुंबणाऱ्या भक्तावर त्याचे सति-सुत, बंधु-मित्र, शेजारी-पाजारी सर्व जण प्रेम करतात. त्याच्यापाशीं द्वेष भावनेला थारा नसतो.

सॉक्रेटिस ग्रीस देशांत एक श्रेष्ठ संत ! त्याचे अनुभवाचे बोल ऐकण्यास हजारोंच्या संख्येने लोक येत असत. त्याने आपले संपूर्ण आयुष्य परम पवित्र अशा ज्ञानाच्या प्रसारासाठींच अर्पिले होते. घरांत काय हवे-नको इकडे त्याचे लक्ष नसायचे. त्याची पत्नी झांथिपि कसाबसा संसाराचा रथ ओढीत नेई !

एके दिवशी घरांत खायला प्यायला कांहींच नव्हते. झांथिपीचे माथे भडकले. ती नवऱ्याला शिव्याशाप देऊं लागली. ते ऐकून तिची शेजारीण तेथे आली. आणि म्हणाली,

''झांथिपि, तूं किती त्रास सहन करते आहेसं बरे ? तुझ्या सारख्या चांगल्या पत्नीचे पालन-पोषण करण्याची बुध्दि तुझ्या नवऱ्याला नसावी काय ? अशा नवऱ्याशी तूं कसा बरे संसार करते आहेस ?''

''हे सखि-शेजारणी ! तूं माझ्या नवऱ्याच्या विषयांत डोके घालूं नकोस. तो कामाला जात नाही. कांहीं मिळवून आणीत नाही; म्हणून ताप झाला म्हणून मी त्याला शिव्या दिल्या. तो वाईट आहे म्हणून मी त्याला शिव्या देते; असं तुला वाटत असेल; तर ते साफ चुकीचे आहे. त्याच्या सात्विक गुणांची आठवण झाली कीं माझ्या मनाला मोठे समाधान लाभते. हृदय भरून येते. मी अशा संताची पत्नी आहे; याचा मला मोठा अभिमान वाटतो. आतां सुध्दां मी माझ्या पतीवर येवढे प्रेम करते कीं तो स्वत: सुध्दां आपल्यावर इतके प्रेम करीत नसेल !'' झांथिपी म्हणाली. तिचे बोलणे ऐकून शेजारणीला फारच आश्चर्य वाटले.

भक्त स्वत:च प्रेमरूप धारण करीत असल्याने कोणीही त्याचा द्वेष करायचा प्रश्नच उद्‌भवत नाही. भगवंताची करूणा-त्याची कृपा, जगाचे प्रेम संपादन करण्याची सुंदर-सुमधुर विद्या म्हणजे ''भक्तियोग'' !

'सत्यं-शिवं-सुंदरं' अशा भगवंताच्या अस्तित्वांत आणि भक्तीच्या शक्तींत आपण अपार श्रध्दा ठेवावी. या साधनेंत तिळमात्र संशय उत्पन्न झाला तरी भक्तियोग सफल होणार नाही. परमानंद लाभत नाही.

एक विशाल आम्रवृक्ष. वसंत ऋतु. फळें रसांनी भरून पक्व होत आहेत. निसर्ग देवतेची मेजवानीची सिध्दता झाली आहे. त्या मेजवानीवर ताव मारायला; त्याचे सुख मिळवायला शेकडो पक्षी त्या वृक्षावर जमले आहेत.

एके दिवशीं सकाळी पक्षी फळांचा आस्वाद घेऊन आनंदाने गात आहेत. अशा वेळीं दोघे प्रकांड पंडित तेथे आले. झाडाखाली पिकून पडलेली कांही फळे गोळा करून खाण्यास तयार झाले. तेवढ्यांत त्यांचे लक्ष वृक्षावर बागडणाऱ्या पक्षांकडे गेले. पक्षी वेगवेगळ्या सुरांत गात होते.

परिशुध्द हृदयाच्या पक्षांचे मधुर गायन संतोषाने ऐकून फळे खाऊन तृप्त व्हायचे सोडून त्या पक्षांच्या किलबिलाटामध्यें-समूह गानामध्यें वेगवेगळ्या रागांचे संमिश्रण झाले आहे, असे त्यांना वाटले. ते कोणकोणते राग असावेत ? अशी चर्चा त्या पंडितांनी सुरू केली.

तास-दोन तासपर्यंत चर्चा तशीच सुरू झाली. त्या चर्चेने गंभीर रूप धारण केले.

तेव्हां तो आम्रवृक्ष म्हणाला, ''अहो पंडित हो, थोडे मौन धारण करा !''

त्या पंडितांना आश्चर्य वाटले, ''कोण बरे बोलत आहे ?'' असे म्हणून त्यांनी आजू-बाजूला पाहिले.

''मी आम्रवृक्ष बोलतो आहे !'' तो आम्रवृक्ष म्हणाला. आम्रवृक्ष बोलतो आहे. हे ऐकून त्यांना फारच आश्चर्य वाटले. त्यांनी विचारले,

''आम्ही कां बरे मौन रहावे ?''

''आतां सूर्योदय होतो आहे. पक्षांचे मधुर संगीत ऐकून मी तन्मय झालो आहे. हा माझा आनंदच फळांमध्ये रसाच्या रूपाने भरून राहिला आहे. तो रस पिऊन गाणाऱ्या त्या पक्षांच्या आवाजांत मधु भरला आहे. त्या मधाचे सेवन करीत मी तो मधु फळांमध्यें भरण्याचे चैतन्य मिळवित आहे. माझ्या कार्यांत तुम्ही विघ्न नका आणूं. तुम्ही थोडे मौन रहा ! शांत रहा !'' तो आम्रवृक्ष म्हणाला.

आम्रवृक्षाचे सुमधुर बोल ऐकून त्या पंडितांच्या हृदयामध्यें प्रेमरस वाहूं लागला. भक्ती म्हणजे एक 'प्रेम रसायन' होय ! हे प्रेमरसायन प्राशन केल्याने परम तृप्ति लाभते. जीवनाच्या सर्व समस्या दूर होतात. कलह नाहीसे होतात. मानवाला चिरशांति लाभते !



# - ३ -
# निरालंब प्रेम !

तत्वज्ञानी, अनुभावी साधु-संतांनी भक्तीची महिमा हृदयपूर्वक सांगितली आहे. भक्ति ही देवाला आणि देव मानव अशा संतांना सर्वांनाच अत्यंत प्रिय होय ! म्हणूनच श्रीकृष्णाने गीतेंत म्हटले.

**''न मे भक्त: प्रणश्यति !''** ''माझा भक्त कधीही नाश पावत नाही. तो माझ्या हृदयांत सदैव स्थान मिळवितो !''

भक्तीची शक्ति अपार आहे ! आपल्या मनांत त्या भक्तीचा प्रवेश झाला कीं पुरे ! जीवनांत अगाध परिवर्तन घडते. सोने, नाणे, पैसा अडका वगैरे प्रापंचिक आकर्षणें गळून पडतात. त्यागभाव दृढ होतो. जीव भक्तियोगि होतो. संकटांना न घाबरणारे अजेय आत्मबल प्राप्त करून घेऊन निश्चिंत, निराभारी होतो.

वीर विरागिणी अक्कमहादेवीच्या अंतरंगी चेन्नमल्लिकार्जुना विषयीं, परमात्म्याविषयीं मधुर भक्ति होती. माता-पित्यांच्या प्रेमळ छत्र छायेंत वाढणाऱ्या निरागस बालिकेवर अगणित संकटें आली. बळ्ळेगांवी प्रदेशाचा अधिपति कौशिक राजा - त्याच्या कामुक दृष्टीला ती पडली. राजाने तिच्या इच्छेविरुध्द तिला आपलीशी करण्याचा प्रयत्न करतांच नेसलेले वस्त्र फेडून टाकून दिगंबर अवस्थेंत ती घराबाहेर पडली. सर्वस्व देवाला समर्पित केल्याने तिच्या मनाला लौकिक मर्यादा स्पर्श करूं शकल्या नाहींत. श्रीगिरी (श्रीशैल) चढून

कदळी वनांत घोर तपश्चर्या करून तिने मोक्ष मिळविला.

तिच्या सारख्याच अनेक साधु-संतांचे देवाला समर्पित जीवन धन्य झाले. या जगांत सामान्य लोकांत न आढळणारी अदम्य साहसी वृत्ति, आणि अद्‌भुत चमत्कार, भक्ति क्षेत्रांतील साधु-संतांच्या, शिवशरणांच्या जीवनांत आढळतो.

विद्वत्ता, शक्तिसामर्थ्य, धनसंपदा देवाने कोणाला कमी कोणाला अधिक प्रमाणांत दिले आहे. पण सकल जीवराशींच्या हृदयांत प्रेमज्योति मात्र समान स्वरुपांत तेवत ठेवली आहे.

हे परिशुध्द प्रेमच भक्ति होय ! ती मधुरातिमधुर.! या परिशुध्द प्रेमामुळेंच जीवन सार्थक, रसपूर्ण, हृद्य ! प्रपंच सुंदर ! हे प्रेम, ही भक्ति नसेल तर जीवन पूर्णपणें रिते-नीरस !

पैसा-अडका, जमीन-जुमला संपादन करणें हाच आमचा परमार्थ. संताला या भौतिक संपत्तीचे मुळींच आकर्षण नसते. पण सत्यामध्यें संताला परमोन्नत प्रेम ! आम्हांला प्रापंचिक विषयांमध्ये गाढ रति. अंतिम सत्य-परमात्म्यावर जे प्रेम करतात; ते संतच सद्‌भक्त, भगवद्‌भक्त ! नश्वर विषयांचा मोह त्यांना नसतो.

प्रेममय दृष्टीने-भक्तिरसपूर्ण दृष्टीने पाहिल्यास हे जग सुंदर, रसपूर्ण ! संताच्या दृष्टीला हे जग म्हणजे ईश्वराचा आवास ! आईन स्टाइन सारखा विज्ञानीसुध्दां विश्वाची ही भव्यता आणि अनंतता पाहून आश्चर्य चकित झाला. भक्ति रसाचा आस्वाद न घेतां आशा पाशांत-भोगविलासांत रममाण होणाऱ्या विषयी पुरुषाला हे जग जड ! भोगवस्तु !

भक्ति ही अमूल्य भाव संपत्ति ! शुध्द-सुंदर असा मधुर भाव आपल्या ठिकाणीं असल्याने हे सर्व जग प्रिय होऊन दिसते. असे ऋषिमुनि सांगतात ! हा मधुर भाव आणि भक्ति हे वेगवेगळे नव्हेत !

या मधुर भावनेने केलेल्या पूजा आदि क्रिया, स्तोत्र-गीत, तत्व चिंतन ही सर्व भक्तीची विविध रुपे होत ! अशा रसपूर्ण मधुर हृदयीं भक्तांवरच देव प्रसन्न होतो. बाह्य दांभिक आचरणाला नव्हे !

शुध्द मन हे एखाद्या स्वच्छ पाण्याने भरलेल्या सरोवरासारखे ! सद्भाव रूपी जल त्या मानस सरोवरांत भरलेले असते. त्यांत प्रेमरुपी कमळ फुलते. त्या कमळांतून प्रस्फुटित होणारा दिव्य सुगंध हीच भक्ति होय ! पुष्प सीमित असते. सुगंध असीम ! तसेंच मनांत उमललेले प्रेमरूपी कमळ सीमित. हृद्गत भक्तिसुगंध निस्सीम असतो !

प्रापंचिक वस्तु-व्यक्ति यांना सीमित प्रेम हे सालंब प्रेम होय ! प्रापंचिक अशी कोणतीही सीमा नसलेले प्रेम, हे निरालंब प्रेम होय ! तीच भक्ति ! या भक्तीमुळेंच भगवद्दर्शन !

एक अत्यंत गरीब माणूस. साधा-सुधा. निर्मळ अंत:करणाचा मधुर जीव ! जख्ख म्हातारा. देवाला प्राप्त करून घ्यायची ओढ ! हिमालयांतील एका सुंदर मंदिरांत देव आहे. असे त्याला कोणीतरी सांगितलेले होते.

त्यावेळी वाहतुकीची साधने नव्हती. पायीं चालतच जावे लागे. कित्येक वर्षे पायीं चालत तो हिमालयांतील त्या मंदिराला पोहोचला. त्या मंदिराचा कळस पाहून देवाला पाहिल्या इतकाच आनंद त्याला झाला होता.

संध्याकाळची वेळ. मंदिराचा दरवाजा बंद करून पूजारी घरी जायच्या तयारींत होता.

''मला देवाचे दर्शन घेऊं द्या !'' त्या वृध्दाने सांगितले.

''आतां दर्शन घडत नाही ! उद्यां ये !'' पूजारी म्हणाला.

''माझ्यावर कृपा करा ! असे नका बोलूं ! मी घरदार सोडून देवाचे दर्शन घ्यायला फारच दुरून पायी चालत आलो.'' तो वृध्द म्हणाला.

पूजारी : ठीक आहे ! देवाला अर्पण करायला काय आणले आहेस ?

वृध्द : सर्वस्वाचा त्याग करून मी आलो. मी काय आणणार आहे ?

पूजारी : तर मग तुला दर्शन घडणार नाही.

वृध्द : देवाला अर्पण करण्यासाठीं भक्तिरसपूर्ण हृदय तेवढे मजपाशी आहे. अन्य कोणतीही वस्तु नाही.

पूजारी : तुझे भक्तिभावाने भरलेले हृदय घेऊन मी काय करूं ?

त्या वृध्दाकडें वळून सुध्दां न पाहतां; मंदिराचा दरवाजा न उघडता; पूजारी घरी निघून गेला.

पण दयानिधी देवाच्या मंदिराचे दार मात्र आपोआप उघडले. वृध्दाचे भक्तिपूर्ण हृदय विजयी झाले ! ती खरी भक्ति ! ते निरालंब प्रेम !!

# – ४ –

# स्वरूप भक्ति

वस्तूची रूपे दोन. एक दिसणारे रूप ! दुसरे असणारे रूप ! दिसणारे ते बाह्यरूप. असणारे ते आंतररूप अथवा स्वरूप ! बाह्य रूपाचे ज्ञान होणें फारच सुलभ ! पण स्वरूप ज्ञान होणे; सतत प्रयत्नाने, साधनेने साध्य !

एखादा नट एकदां नाटकांत राजाची भूमिका करतो. दुसऱ्यावेळीं भिक्षुकाची भूमिका करतो. प्रेक्षक एकदां त्याला राजा मानतात तर दुसऱ्या वेळीं त्याला भिक्षुक समजतात. खरे पाहतां तो राजा नव्हे आणि भिक्षुकही नव्हे. तो एक सामान्य माणूस ! ते त्याचे खरे स्वरूप !

नटाचा रंग उतरविला-कपडे उतरविले तर त्याचे खरे रूप दिसते. तोंडाला रंग फासून कपडे करून रंगभूमीवर अवतरतो त्यावेळीं त्याचे रूप जितके आकर्षक वाटते; तेवढे ते रंग उतरविल्यावर नसते. वस्तूंच्या बाह्यरूपाचा रंग तरी शाश्वत असतो कां ? नाहीं. तो क्षणाक्षणाला बदलत असतो. अस्थिर अशा नाम रूपाचा पडदा सारून पाहिले असतां मात्र सत्यदर्शन ! ते सर्वांना लाभत नाही. जाणत्या लोकांनाच स्वरूप ज्ञान घडते. सत्यदर्शन होते !

सगळ्या जगाने वाल्मिकीला त्याच्या पूर्वाश्रमांत एक क्रूरकर्मा

बेरड म्हणूनच ओळखले. मोठा कठोर हृदयी-हिंसक होता तो. त्याचे नांव ऐकले की पुरे ! लोक सगळे त्याला घाबरून थर थर कांपत असत. पुढे त्याच वाल्मिकीला नारद मुनि भेटले. बेरडाच्या कठोर आणि क्रूर हृदयांत खोलवर दडून राहिलेल्या महाकवीला नारदांनी ओळखले. बेरडाच्या क्रूर कृत्यांनी त्याच्यांतील महाकवीवर पुटे चढली होती. नारद मुनींनी ती पुटे बाजूला सारली. बेरडाच्या हृदयांत दडून राहिलेल्या त्या महाकवीची नारदांनी स्तुति केली. त्याच क्षणीं वाल्मिकीमध्यें दिसणारा बेरड नाहीसा झाला. दडून राहिलेला महाकवि प्रगट झाला !!

कित्येक वेळां आपण स्वस्वरुप विसरून बाह्यरुपांतच रममाण होतो. 'मी स्त्री', 'मी पुरुष', 'मी श्रीमंत', 'मी ज्ञानी', 'मी अज्ञानी' अशी कांही तरी समजूत करून घेतो. पण ते सर्व आपले बाह्यरूप मात्र. स्वरुप नव्हे. याचे आपणांस ज्ञान नसते. आपल्या ठायीं सुप्त रूपाने असलेल्या परम सत्याचे स्वरूप जाणण्यासाठी अनुभावी साधु-संतांनी दाखविलेल्या भक्तिपथामध्यें आपण मार्गक्रमण करावे.

आतांच आपण पाहिले कीं कोणत्याही वस्तूला दोन रूपे असतात. एक बाह्यरूप, दुसरे स्वरूप. तसेंच भक्तीमध्यें सुध्दां दोन प्रकार ! पहिले बाह्यरूप (अपरा) भक्ति व दुसरे स्वरूप (परा) भक्ति. देश-काल अस्थिर वस्तूची बाह्यरूप भक्ति हीच अपरा भक्ति होय !

देशकालाची बाधा नसलेल्या स्थिर वस्तूची आंतररूप भक्तीच स्वरूप भक्ति अथवा परा भक्ति. ही खरी भक्ति होय !

खऱ्या खुऱ्या भक्तीचे स्वरूप न जाणल्यामुळें आपण आठवड्याचे दिवस, क्षेत्र देवांना वांटून टाकले आहेत. एका देवाच्या वारी दुसऱ्या देवापुढे हात जोडायचे सुध्दां आपणांस मन होत नाही. एका क्षेत्रांत चुकून सुध्दां दुसऱ्या क्षेत्रांतील देवाचे स्मरण आपण करीत नाही. आपली भक्ति सुध्दां देश काल यांच्या तावडीत सापडून छिन्न विच्छिन्न झाली आहे.

प्रापंचिक अपेक्षा बाळगून आपण एका देवाची पूजा करतो. आपली इष्टार्थ सिध्दी झाली नाही तर हा देव जागृत नाही. असे म्हणून दुसऱ्या देवाला जातो. तेथेंही तसेंच घडले तर पुन: तिसऱ्याच देवाच्या शोधांत जातो. खऱ्या भक्तीचे स्वरूप न जाणणारे लोक जीवनभर असेच तडफडत असतात.

पूर्वी एकदां अष्टग्रह एकत्र येतात, जगाला फारच त्रास होतो, देव भक्तीनेच या अष्टग्रहांची पीडा दूर होते, या भावनेने देश भर भक्तीचा महापूर उसळला. एकत्र आलेले ग्रह अलग झाले. संकट टळले याची खात्री होतांच भक्तीचा पूर ओसरला. पात्र कोरडे ठणठणीत झाले. बाह्यरूपाची भक्तीच तशी ! हा भक्तीचा प्रवाह केव्हां दुथडी भरून वाहायला लागेल आणि कैंव्हा पात्र कोरडे पडेल याचा भरंवसा नाही.

घर-दार, पुत्र-पौत्र, वनिता इत्यादि प्रपंचांतील कोणत्याही वस्तूच्या बाह्य रूपावरील प्रेम असेच असते. प्रेम पात्र वस्तु पडते, उठते. दोलायमान होते. तेव्हां आपले प्रेम सुध्दां दोलायमान होते.

पैशावर प्रेम करणाऱ्या पत्नीला महिन्याच्या पहिल्या आठवड्यात

पगार आणणारा पति-परदैवच होय ! पण महिन्याच्या शेवटी... शेवटी...?

धन लोभी पतीला माहेरून हवा तसा हुंडा-मानपान आणणारी पत्नी साक्षात् गृहलक्ष्मी ! तिने माहेरून पैसे नाही आणले तर...?

निवडणुका जवळ आल्यानंतर मंत्रिमहोदयांचे जनता जनार्दनाविषयीचे प्रेम उतू येते. त्यानंतर... ?

अधिकार असेपर्यंत मंत्रिमहोदयांचा आदर सत्कार इंद्राला चंद्राला सुध्दां मागे सारणारा. अधिकार पदावरून उतरल्यावर... ?

बाह्यरुप प्रेमाची-भक्तीची हीच कथा !

-परम सत्याचा आश्रय केलेली स्वरूप भक्ति सुस्थिर. निर्मल, शांत ! तर मग ती परमसत्य वस्तु कोणती ? ती वस्तु कोणती ? ते सांगता येत नाही. पण ती वस्तु तीच आहे. ''ॐ तत्सत् !''

त्या परम सत्य वस्तूला मी एखादे नांव ठेवून, त्या नांवाने संबोधिले असतां ते 'माझे सत्य'. परमसत्य नव्हे. त्या सत्याला मी 'शिव' असे नांव ठेविले तर ते 'शैव सत्य'! 'विष्णु' असे संबोधिले असतां 'वैष्णवसत्य' ! शिव, विष्णु, राम, कृष्ण या सर्व नांवाना वगळल्यानंतर जे उरते तेच परम सत्य होय !

गंगाजल, कृष्णाजल, कावेरी जल, विदेशी जल, स्वदेशी जल हे सर्व वेगवेगळे असा वाद आपण करतो. हा आमचा वाद ऐकून ते जग

भरित जल सुध्दां हंसल्यावाचून राहणार नाही. देश-काल यांकडे न पाहतां केवळ जलाकडे पाहिल्यास जगांतील सर्व जल एकच होय ! जगांतील समस्त वस्तूंचे बाह्य नाम-रूप सोडून आंत पाहिले तर सत्य एकच ! या परम सत्याचे प्रेमच स्वरूप भक्ति होय ! त्या पासूनच जीवन्मुक्ति !!



# - ६ -
# निर्भीत

जे जे दिसते व नाहीसे होते ते जग. जे दिसत नाही पण शाश्वतपणें असते ते ब्रह्म ! ते परमसत्य, परिपूर्ण, अनंत. अशा सत्याचे परमप्रेम हीच भक्ति ! भक्तिसुध्दां सत्याइतकीच नित्य, परिपूर्ण, अनंत ! हे जग अनित्य, अपरिपूर्ण, सांत. त्यामुळे या जगाचे प्रेम सुध्दां तेवढेच अनित्य अपरिपूर्ण सांत !

श्रीरामाने सीतेवर आपल्या प्राणाहूंन अधिक प्रेम केले. सागराहून खोल आणि आकाशाहून उत्तुंग असे ते प्रेम ! रावणाच्या तावडींतून तिची सुटका करण्यास त्याने समुद्रावर सुध्दां सेतु बांधण्याचा अद्‌भुत पराक्रम केला. हजारो लोक या युध्दांत बळी पडले. सीतेने अग्निदिव्य केले. पण एका सामान्य परटाच्या बोलण्याने राम व्यथित झाला.

''सोडून गेलेल्या पत्नीला पुन: घरांत घ्यायला मी कांही राम नव्हे !'' या उद्‌गारांनी श्रीरामाचे सीतेवरील गाढ प्रेम दोलायमान झाले. शेवटीं रामाने सीतेचा त्याग सुध्दां केला.

परम प्रेम तसे नसते. ते कधीही दोलायमान होत नाही. अमृतासम गोडी असलेल्या मिष्टान्न भोजनानंतर आपण आंत बाहेर, आजूबाजूला संतृप्तीचा सुगंध पसरलेला अनुभवतो. तसेंच प्रेमामृताचे सेवन केलेल्या

माणसाच्या सभोवती अमर प्रेमच भरून राहिलेले असते. तो सदैव निश्चल, निश्चिंत, निर्भीत !

इटली देशांत एक संत होता. त्याचे जीवन परिशुध्द, प्रभाव पूर्ण ! तो अरण्यांत वास करीत असे. एकदां धर्मोपदेश करण्यासाठी तो एका गांवी गेला. तेथे एक मोठा श्रीमंत गृहस्थ होता. त्याचा मुलगा हिलेरिओ. दहा-बारा वर्षांचा असेल तो. बालक हिलेरिओने संताचा उपदेश श्रवण केला. माता-पित्यांहून अधिक प्रेम त्या संताच्या वाणींत आढळले हिलेरिओला ! दुसऱ्या दिवशीं त्याने पुन: संताचा उपदेश श्रवण केला. तिसऱ्या दिवशीं हिलेरिओ त्या संताच्या पाठोपाठ निघाला ! श्रध्देने संताची सेवा करून त्याच्या पूर्ण कृपेला तो पात्र ठरला !!

दोन वर्षांनी तो महासंत अंतोनिओ देवाघरी गेला. हिलेरिओ परत आपल्या गांवी गेला. घरी कोणीच नव्हते. त्याचे आई-बाप मरून गेले होते. आतां हिलेरिओ पोरका झाला. आई-बाप नाहीत, गुरु नाही, बंधु-बांधव नाहीत. त्याच्या मनांत संत अंतोनिओची पावन मूर्ति ! हृदयीं दैवी प्रेम शाश्वतपणें वसले होते.

तरुण संत हिलेरिओने लोकांना सांगितले, ''लोक हो ! हे घर दार, ही संपत्ति सर्व तुमची ! गावांच्या कल्याणासाठीं याचा विनियोग करा.''

लोकांनी विचारले, ''तुजपाशी काय राहिले ?''

''गुरूने दिलेली प्रेम संपदा मजपाशी आहे. ती कधीही न संपणारी सत्य संपदा !'' हिलेरिओ म्हणाला.

''आतां तुम्ही कोठे निघालांत ?'' लोकांनी विचारले.

''देवाच्या साम्राज्यांत !'' हिलेरिओ म्हणाला.

''कोठे आहे ते देवाचे साम्राज्य ?'' लोकांनी विचारले.

''मी आणि माझे असे म्हणणे सोडले तर सर्व कांही देवाचे साम्राज्यच होय !'' संत हिलेरिओच्या त्यागाने सर्व लोक प्रभावित झाले.

हिलेरिओ जन वसतीपासून दूर-दूर अरण्यांत जाऊन राहिला. सृष्टि सौंदर्याच्या अद्‌भुत जंगलांत ! डोंगर-दऱ्याखोरी, खळखळ वाहणारे निर्झर, वृक्ष वेली, फळ फळावळ पशु-पक्षी यांनी समृध्द असा जणूं निसर्गाचा स्वर्गच ! हिलेरिओ त्या दैवी साम्राज्यांत दैवी प्रेमाचा अनुभव घेत रमून गेला.

एके दिवशीं तेथे एक भयंकर क्रूर चोर आला. त्याने हिलेरिओला विचारले, ''या घोर अरण्यांत तूं कां आलास ?''

''हे तर प्रेमाचे साम्राज्य ! म्हणून मी येथे आलो.'' हिलेरिओ म्हणाला.

''आश्चर्य ! लोक सगळे या भयानक जंगलांत जाण्यास घाबरतात. या जंगला येवढे भयानक स्थान दुसरे नाही असे म्हणतात ना ?'' चोराने विचारले.

''हा ज्यांच्या त्यांच्या आवडी-निवडीचा प्रश्न आहे.'' हिलेरिओ म्हणाला.

''तूं कोण आहेस ?'' चोराने विचारले.

''मी देवाचा भक्त आहे !'' हिलेरिओ म्हणाला.

''अरण्यांत कोणी तरी चोर आला तर ?'' त्या चोराने विचारले.

''त्यांच्या समवेत मी माझी प्रेम संपदा वाटून घेईन.'' हिलेरिओ म्हणाला.

''चोरांनी तुला ठार मारून टाकले तर ?'' चोराने विचारले.

''मला कशाचीच भीति नाही. मी निर्भीत. मी मरणावर सुध्दां प्रेम करेन !'' हिलेरिओ म्हणाला.

संताच्या सभोवती पसरलेला प्रेमाचा सुगंध त्या चोराने अनुभविला. त्याचे हृदय परिवर्तन घडले. आपल्या शेकडो अनुयायां समवेत तो हिलेरिओचा शिष्य झाला. खऱ्या भक्ताची ही निर्भीत अवस्था होय !

युरोपांत एक श्रीमंत घराणे. परस्परांवर प्रेम करणारी दंपति ! मोठा व्यापार ! एकदां व्यापारांत मोठा तोटा झाला. क्षणार्धांत तो लक्षाधीश भिक्षाधीश झाला.

पतीचे म्लान मुख पाहून पत्नीने विचारले, ''काय झाले ?''

''व्यापारांत मोठा तोटा झालाय. आपण आतां अत्यंत दारिद्री आहोत. '' व्यापारी सुस्कारा टाकीत म्हणाला.

''आपण दारिद्री होणें शक्य नाही. आपण जगांतील सर्व श्रेष्ठ श्रीमंत आहोत.'' पत्नी म्हणाली.

''ते कसे ?'' पतीने आश्चर्याने विचारले.

''आपल्या हृदयांत प्रेमाची संपत्ति असे पर्यंत या जगांत आपणांहून अधिक श्रीमंत कोण आहे ?'' पत्नी म्हणाली.

प्रापंचिक प्रेमाच्या बळावरच माणूस इतका निर्भय होतो. तर मग पारमार्थिक परम प्रेमरूप भक्तीने आपण केवढे बरे निर्भय होऊं शकूं ? जनन-मरणादि सकल भय-भीति सांडोनीया निर्भीत होतो संत ! तोच परम पावन, जगद्वंद्य भक्तियोगी होय !



## - ६ -

# नित्यतृप्त

बहिरंगांतील वस्तु शब्दांनी वर्णन करणें फार सोपे. अंतरंगातील भावना तेवढ्या सुलभपणें वर्णन करतां येत नाहीत. सुख दुःखादि लौकिक अलौकिक भक्तिभाव वर्णन करणें कठिण !

अल्लमप्रभुदेव अनुभावी आणि आध्यात्मिक श्रेष्ठ कवि ते म्हणतात.

***घनतर चित्रद रूह बरेयबहुदल्लदे***
***प्राणव बरेयबहुदे अय्या ?***
***दिव्यागमंगळु हेळिद क्रियेयल्लि दीक्षेय माडबहुदल्लदे***
***भक्तिय माडबहुदे अय्या ?***
***प्राणवह भक्तिय तन्मय नीनु !***
***ई गुणवुळळल्लि नीनिहे, इल्लदल्लि नीनिल्ल गुहेश्वरा.***

उत्तम चित्र चितारतां येईल. पण त्या चित्रांत प्राण भरतां येईल काय ? दिव्य आगमांत सांगितल्या प्रमाणे क्रिया करून दीक्षा देतां येईल. पण भक्ति करतां येईल काय ? प्राणवह भक्तीमध्ये तूं तन्मय होतोस. ते गुण असतील तर तूं आहेस. ते गुण नसतील तर तूं नाहीस गुहेश्वरा !

आपण ज्या वस्तूंना पाहतो, त्याच वस्तूंना कविसुध्दां पाहतो. पण आपणांहून अधिक विशेष सौंदर्याचा अनुभव कवि घेतो. सत्यदर्शन मिळवितो. आपणांस तसा अनुभव येत नाही. कां बरे ?

आपणांपाशी कविहृदय नाही.कवीची दृष्टी नाही.त्यामुळे आपल्या अंतरंगांत सत्य रूपी सूर्योदय होत नाही ! भक्ति-भाव रूपी कुसुम उमलत नाही !!

प्रभुदेव म्हणतात, दिव्यागमांमध्ये सांगितलेल्या क्रियांना अनुसरुन श्रीगुरु शिष्याला दीक्षा देऊं शकेल. पण त्याला भक्ति देऊं शकणार नाही. व्यक्तीच्या बाह्य रूपाप्रमाणे असते ती क्रिया. व्यक्तीच्या प्राणांप्रमाणे असते ती भक्ति !

एखादा माणूस जेवढा सुंदर असेल तसे हुबेहुब त्याचे चित्र काढतां येईल. पण त्यां माणसाच्या अंतरीं असणाऱ्या प्राणांचे चित्र काढतां येईल काय ? फूल कितीही सुंदर असले तरी त्याचे हुबेहुब चित्र काढतां येईल. पण त्या फुलामधील सुगंधाचे, मकरंदाचे चित्र काढतां येणार नाही. प्राण, सुगंध जसे सूक्ष्म तशी भक्तीसुध्दां सूक्ष्म !

सीमित अशा स्थूल वस्तूंचे वर्णन करतां येईल. पण भक्ति भाव निस्सीम, सूक्ष्म असतो. त्यामुळें भक्ति-भावाचे वर्णन करतां येत नाही. जगांतील अनेक श्रेष्ठ कवींनी मानव प्रेमाविषयीं हजारो महाकाव्यें रचली असली तरी 'त्या प्रेमाचे समग्र वर्णन केले आहे.' असे कोणीही म्हटले नाही. मानवांच्या सामान्य अशा लौकिक प्रेमाचेच पूर्णपणें वर्णन करतां आले नाही. तर मग अलौकिक दैवी भक्तीचे वर्णन कसे करतां यईल ?

एक श्रीमंत देवाला अष्टोपचार, शतोपचार, सहस्त्रोपचार,

लक्षदीपार्चन करवितो. ती त्याची पूजा आपण डोळ्यांनी पाहूं शकतो. अमूक इतके पैसे खर्च झाले; अशी त्या पूजेची पैशांत किंमत करतां येईल.

दुसरा एक भक्त मंदिरांत येतो. दयासागर, जगद्रक्षक अशा त्या देवाची मूर्ति डोळे भरून पाहतो. देवाची कृपा-देवाचे कारुण्य अनुभवतो. त्याच्या डोळ्यांतून आनंदाच्या अश्रुधारा वाहूं लागतात. या भक्ताच्या भक्तीचे मोजमाप करतां येईल काय ? त्या भक्ताच्या हृदयांतील भक्ति-भावाचे मोल पैशांत करतां येईल काय ?

तराजूच्या एका पारड्यांत एक बृहत् संख्या, दुसऱ्या पारड्यांत असंख्या. त्या दोहोंना तोलून त्यांची तुलना करतां येईल काय ? लौकिक प्रेम-सामान्य प्रेम एका निश्चित संख्येप्रमाणे सीमित. अलौकिक-असामान्य प्रेम असंख्येप्रमाणें निस्सीम. अगम्य अपार ! हीच भक्ति. या भक्तीची तुलना होऊं शकत नाही.

भक्ताला प्राणासमान असणारी भक्ति भगवंताला फारच प्रिय ! त्यामुळें जेथे भाव-तेथे देव ! जेथे भाव नाही. तेथे देव नाही.

प्राणांना प्राण होऊन असणारी ही भक्ति, हे परमप्रेम आपल्या सकलेंद्रियांनी अभिव्यक्त करतो. तोच भक्त !! त्या भक्ताचे जीवन परम पावन होय ! मधुर होय ! तो नित्यतृप्त असतो. 'सगळ्या नद्या माझ्याकडें वाहात येवोत.' अशी अपेक्षा सागर करीत नाही. आणि आल्या तरी त्यांना नको असे सागर म्हणत नाही. तसेंच भक्त सुध्दां हवे-नको असे न म्हणतां सागराप्रमाणें नित्य तृप्त असतो.

माता आपल्या बालकाला आकंठ स्तनपान करविते. आणि मगच

बाळाला उचलून घेऊन स्वयंपाक घराकडे येते. सणासुदीच्या दिवशीं स्वयंपाक घरांत नाना प्रकारची मिष्टान्ने असतात. पण ते बालक त्या मिष्टान्नांकडे ढुंकून सुध्दां पाहात नाही. कारण मातेचे दूध पिऊन बाळ तृप्त झालेले असते. तसेंच भगवद्भक्त सुध्दां ! परम प्रेमामृताचे आकंठ पान केलेला भक्त जगांत अन्य कशाचीही अपेक्षा करीत नाही. कुणी-कांही देण्या आधीच हात पसरणारे आपण कोठे ? आणि सभोवती वाटेल तितकी धन संपदा असून ही तिकडे नजर सुध्दां न फिरविणारा भक्त कोठे ?

एका गावांत एक गरीब कुटुंब राहात होते. त्यांना आठ वर्षांचा एकच मुलगा होता. नवरा-बायको दोघेही मोल-मजूरी करून जीवन कंठीत असत. आपल्या मुलाचे पालन पोषण अत्यंत प्रेमाने करीत असत.

विधिवशात् त्या मुलाचा पिता वारला. आईने अंथरूण धरले. त्या लहान मुलावरच मोल-मजूरी करायची पाळी आली. मुलाचे खाण्या-पिण्याचे-खेळण्या-बागडण्याचे वय ! अशा लहान वयांत इतके कष्ट करावे लागतात हे पाहून आईला फारच दुःख होई.

एके दिवशीं रात्री तो बालक दिवसभर काबाडकष्ट करून दमून भागून झोपी गेला होता. आई देवाची प्रार्थना करीत होती.

''हे देवा ! मला लौकर तुझ्या पायांपाशी बोलावून घे रे बाबा ! माझ्या लेकराचे हाल माझ्याने पाहवत नाहीत !''

वेषांतर करून फिरत असणाऱ्या त्या देशाच्या राजाने मातेचे ते करुणाजनक बोल ऐकले. त्या झोपडींत येऊन जराजर्जर झालेल्या

त्या मातेला पाहिले. बालकाला जागे केले.

''मी या देशाचा राजा आहे. तुझे कष्ट पाहून मला फार वाईट वाटते. उद्यां सकाळींच तुमच्या उपजीविकेसाठी आवश्यक ते सर्व सहाय मी देईन. तूं कसलीच चिंता करूं नकोस !'' राजा म्हणाला.

राजाचे हे बोलणें ऐकून तो बालक म्हणाला, ''महाराज, तुमच्या औदार्याबद्दल धन्यवाद ! पण माझ्या हातापायांत काम करण्याची शक्ति आहे. ती शक्ति मला देवाने दिली आहे. मातेवर माझी भक्ति पण आहे. मी आनंदाने काम करतो. मातेची सेवा करतो. मी संतुष्ट आहे. तुमचे सहाय मला नको !''

त्या मातृभक्त बालकाप्रमाणेंच भगवद्‌भक्त सुध्दां भगवत्कार्यांत नित्य तृप्त असतो.

सॉक्रेटिस महान संत ! महाज्ञानी ! त्याची वाणी अनुभवपूर्ण ! अति सुंदर ! त्याचा देह मात्र कुरुप !

एकदां सॉक्रेटिसचे दोघे शिष्य आपासांत बोलत होते,

''आपल्या गुरुजींची वाणी किती मधुर ! पण त्यांचे मुख आणि देह तसे नाहीत. याचे त्यांना वाईट वाटत असेल ना ?''

सॉक्रेटिसच्या कानांवर हे बोल पडले. तो उगाच हंसला. त्याच्या जीवनांत संतृप्ति भरून राहिली होती. त्याच्या संतृप्तीला त्याचे बाह्यरुप बाधक ठरले नव्हते.

गरीबी, भांडकुदळ बायको, द्वेष करणारा अधिकारी वर्ग या सर्वांच्या मध्येंसुध्दां सॉक्रेटिस नित्य-तृप्त होता ! याचे कारण, त्याचे सत्यप्रेम ! सत्य प्रज्ञा !

# - ७ -

# सहज भक्ति

निसर्गाने मानवाला दिलेली अद्भूत देणगी म्हणजे भावना. त्यामुळें आपली विद्या-बुध्दि, धन-संपदा, स्थान-मान या सर्वांना महत्व ! ही भावश्री नसेल तर प्रपंच सुध्दा नाही आणि पारमार्थ ही पण नाही.

आपल्या सर्व जाती, मत-पंथ, संघ-संस्था, धर्म, समाज या भावनेवरच अवलंबून आहेत. आपल्या जीवनांतील जयापजय, सुख-दु:ख, हानी-लाभ, मान-अपमान सर्व कांही आपल्या 'भावने' वरच अवलंबून आहे. एकंदरीत ही 'भावना'च 'सर्वाधार' भावनेच्या मजबूत पायावरच मानव जीवनाचा सुंदर महाल उभा आहे.

प्रेम म्हणजे हृदयाचा एक मधुर भावांश ! या प्रेम भावनेने वस्तु सुखदायक होतात. जीवन रसपूर्ण होते. ही भावनाच नसेल तर माणूस आणि यंत्र यांमध्ये कांहीच फरक उरत नाही. यंत्रमानव आपणांपेक्षा कितीतरी अधिक बुध्दिमान आहे. पण मानवा प्रमाणें तो सुख - दु:खांचा अनुभव घेऊं शकत नाही.कारण यंत्रमानवापाशी प्रचंड बुध्दि आहे. पण हृदय नाही.

मानवाच्या हृद्गत प्रेमामध्यें दोन प्रकार. १) सांबंधिकप्रेम. २) सहज प्रेम ! व्यावहारिक असे सांबंधिक प्रेम म्हणजे भक्ति नव्हे. पवित्र असे सहज प्रेम म्हणजे भक्ति !

''हे फूल माझे आहे. त्यामुळें मी या फुलावर प्रेम करतो.'' हे झाले सांबंधिक प्रेम !

''हे फूल सुंदर आहे. म्हणून मी या फुलावर प्रे म करतो.'' हे झाले सहज प्रेम ! तसेंच हे घर - दार, देश - प्रदेश माझे अथवा दुसऱ्यांचे असे न मानतां यावर प्रेम केले तर ते सहज प्रेम होय.

स्कायलार्क पक्षाचे गाणे ऐकून वर्डस्वर्थ कवीला भावसमाधि लागत होती. कोकिळेच्या मधुर कूजनाने कालिदासाचे हृदय आनंदाने ओथंबून जाई. या पक्षांना विचारले, ''तुम्ही कां बरे गातां ?'' तर ते पक्षी काय सांगतील? त्यांच्या हृदयांत प्रेम भरुन ओसंडून वाहात आहे. गायिल्या शिवाय त्यांना राहवत नाही. त्यामुळें ते पक्षी गातात. कोणी तरी आपले गाणे ऐकावे; आपली स्तुति करावी म्हणून ते गात नाहीत. हे सहज प्रेमच भक्तीचे एक रुप होय.

मंदिरांत देवासमोर दोघे जण ध्यानस्थ बसले आहेत. त्यांच्या डोळ्यातून आनंद बाष्प वाहात आहेत. त्याच वेळीं तेथे संत येतो. त्यांची भक्ति पाहून संतोष व्यक्त करतो. ते दोघेही भक्त ध्यानावस्थेंतून उत्थान झाल्यावर त्यांनां संत विचारतो.

''तुम्हांला देवावर येवढी श्रध्दा - भक्ति, भाव परवशता कशी लाभली ?''

''महादानी देवाने माझ्या अनेक प्रापंचिक आवश्यकता पुरविल्या आहेत. माझा संसार सुखाचा झाला आहे. त्यामुळें ही देवाची मूर्ति पाहताच मी भाव परवश होतो.'' एक भक्त म्हणाला.

''करुणासागर देवाची पावन मूर्ती पाहतांच माझे हृदय भरून येते. देवाचे स्मरण होतांच मला न कळत माझ्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहू लागतात.'' दुसरा भक्त म्हणाला.

पहिल्या भक्ताचे सांबंधिक प्रेम ! ती खरी भक्ति नव्हे. दुसऱ्या भक्ताचे सहज प्रेम ! ही खरी भक्ति ! सहज भक्ति !

जगांत सहज प्रेम लाभणें दुर्लभ. सांबंधिक प्रेमच अधिक ! ज्याची त्याची जात - गोत, पैसा - अडका, स्थान - मान पाहून लोक प्रेम करतात केवळ प्रेमासाठी प्रेम करणारे. सहज - भक्ति करणारे किती जण ? *अल्लम प्रभुदेव म्हणतात,*

***भवविरहितंगे भक्तिय माडुवरु नींवु केळिरण्णा,***
***भवबाधेयोळगे नींविद्दु अभव भक्तिय माडुव परियंतो ?***
***तान भवनादल्लदे सहज भक्तिय माडबारदु गुहेश्वरा.***

(भवरहिताची भक्ति करणारे तुम्ही ऐका. भवबाधेमध्यें तुम्ही असून अभव भक्ति करण्याची रीत कोणती ? आपण अभव झाल्याशिवाय सहज भक्ति घडत नाही; गुहेश्वरा)

भव म्हणजे जीवन - मरण, सुख - दुख, मान - अपमान, हानी -लाभ, जय - अपजय, काम क्रोध यांनी युक्त असे जीवन. माणूस या भवामध्यें राहून नश्वर वस्तूंवर प्रेम करीत भव - बाधेंत तळमळतो.

देव हा जनन - मरण रहित अभव, भवरहित ! त्याला कोणतीही प्रापंचिक भव - बाधा नाही ! आपल्या ठायीं नश्वर भवा विषयींचे प्रेम कमी व्हावे. तेव्हां अभव अशा देवावर आपणांस सहज प्रेम उत्पन्न होते. हीच सहज भक्ति होय !

मेघ जेव्हां बरसतो तेंव्हा तो उच्चनीच गांव-शिवार नदी-पर्वत असा भेदभाव न धरता सहजपणें सर्वत्र समभावाने बरसतो. भक्त सुध्दां जाति - मत, आपला - परका, गरीब - श्रीमंत असा भेदभाव न धरतां सर्वांवर समभावाने प्रेम करतो. ते सहज प्रेम. देवाला - गुरूला प्रिय असते ते सहज प्रेम ! सांबंधिक प्रेम नव्हे.

एक होते ज्येष्ठ गुरु. एकदां दोघे भक्त त्यांच्या दर्शनास आले. एक होता श्रीमंत. दुसरा होता गरीब. श्रीमंताने सोन्याच्या ताटांत पंच - पक्वान्ने आणली होती. गुरु पुढे ते ताट ठेवून तो भक्त म्हणाला,

''गुरू महाराज, आपणांसाठी विविध भक्ष्य - भोज्य पंच पक्वान्ने आणली आहेत. आपण सिध्दि पुरुष आहांत. आपण याचा स्वीकार करावा आणि आम्हांला सुख - समृध्दि लाभावी असा आशिर्वाद द्यावा.''

गरीबाने मातीच्या थाळीमध्यें दही - भात आणला होता. त्यानें ती थाळी गुरु समोर ठेवून हात जोडून विनंती केली.

''गुरू माऊली, आपणांसाठी मी हा दही - भात आणला आहे. आपण त्याचा स्वीकार करण्याची कृपा करावी. मला फार संतोष होईल.''

गुरूने त्या गरीब भक्ताचा दही - भात स्वीकार केला. गुरूची सेवा करणाऱ्या शिष्याने विचारले, ''गुरू महाराज, पंच पक्वान्नें सोडून आपण दही - भाताचा स्वीकार केलांत. कां बरे ? ''

गुरू म्हणाले, ''हा केवळ दही - भात नव्हे. ते तर अमृत ! त्या दही - भातांत निष्काम भक्तीचे सहज प्रेम भरलेले आहे ! श्रीमंताच्या

या पंच पक्वान्नामधें आशेचे कल्मष भरले आहे.''

## *देवाला निष्काम भक्ती प्रिय आहे.*

नरसी मेहता एक फार मोठे संत. ते जेव्हां वयाने लहान होते, तेव्हां आपल्या भावाच्या आश्रयांत होते. घरी भावजय बालक नरसीचा फारच छळ करीत असे. रात्रं दिवस त्याला कामाला जुंपे ! त्याच्या हातांतून कधीही काम सुटले नव्हते. बालकाने किती ही काम केले तरी भावजयीला तृप्ति नव्हती. ती सदा नरसीला शिव्या - शाप देत असे.

एके दिवशी रात्री बालक काम करून थकला आणि झोपी गेला. अतिश्रमाने त्याला झोपसुध्दां नीट लागत नव्हती. मनांतच तो देवाची प्रार्थना करुं लागला.

''देवा ! कसे तरी करून माझे कष्ट दूर कर !''

मुग्ध बालकाच्या भक्तीला देव प्रसन्न झाला. प्रत्यक्ष समोर उभा राहिला. म्हणाला,

'' बाळा, तुझ्या निःस्वार्थ सेवेने आणि प्रार्थनेने मी संतुष्ट झालो आहे. तुला काय हवे ते माग ! मी देईन ''

*बालक म्हणाला, ''देवा, तुला जे प्रिय आहे; तेच मला दे !''*
*देव म्हणाला, '' बाळा, मला भक्ति तेवढीच प्रिय आहे. ! ''*
*बालक म्हणाला, ''तर मग मला तेवढी भक्तीच दे !''*

बालकाच्या श्रध्देने संतुष्ट झालेल्या देवाने त्याला सहज - प्रेम रुप भक्ति प्रदान केली ! पुढे तोच बालक फार मोठा संत झाला.

गुरू आणि देवाला समान रूपाने प्रिय वस्तु म्हणजे सहज - भक्ति !

## - ८ -

# सत्य दृष्टि

या जगांतील वस्तु आपल्या शरीराबाहेर आहेत. आणि त्या वस्तूंचा अनुभव घेणारे आपले मन आपल्या शरीरांत आहे. वस्तूंना एकच मुख असत नाही. त्याना अनेक मुखें असतात. त्या वस्तूंचा अनुभव घेणाऱ्या आपल्या मनांत सुध्दां एकच भाव असत नाहीं. अनेक भाव असतात. त्यामुळें एकच वस्तु दोन व्यक्ति एकाच रीतीने पाहात नाहीत. येवढेच नव्हे तर एकच व्यक्ति दोन भिन्न - भिन्न क्षणीं एकच वस्तु एकाच रीतीने पाहूं शकत नाही

येथे एक फूल आहे. या फुलाला अनेक मुखे, अनेक वर्ण अनेक आकार सुगंध, मकरंद वगैरे. त्या फुलाकडे पाहणारा माणूस एकदां त्या फुलाच्या रंगाकडे ध्यान देतो. आणखी एकदां त्या फुलाचा आकार, सौंदर्य, सुगंध यांकडे लक्ष देतो. त्यामुळें त्याला प्रत्येक वेळी हे फूल वेगवेगळे दिसते.

तेच फूल आपण सुखांत असतांना एक प्रकारे दिसते. दुःखांत असतांना वेगळे दिसते. त्यामुळें एका वस्तू विषयीं आपण जे समजतो ते परम सत्य नव्हे. सध्यां आपण ज्या भावनेने त्या वस्तूच्या एका मुखाकडे पाहतो त्याला संबंधित असे ज्ञान आपणांस होते.

एक माणूस आपणांस एकदां चांगला वाटतो. आणखी एकदां तो

चांगला नाही असे वाटते. पण तो माणूस असो अथवा त्याच्याकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोन अथवा भावना असो; स्थिर नव्हेत. त्यामुळें कोणतीही वस्तु अथवा व्यक्ति यांच्या विषयीं 'इदमित्थं,' हे असे. अथवा तो असा असे सांगतां येत नाही.

तरी पण आपण या प्रपंचात स्थिरता असावी अशी इच्छा करतो. आपले घर - दार, स्थान - मान, धन - संपदा सर्व कांहीं स्थिर असावे. असे आपण म्हणतो. प्रत्यक्ष श्रीकृष्ण परमात्म्याने बांधलेली - भूलोकावरील अमरावतीप्रमाणें वैभवसंपन्न द्वारका नगरी स्थिर राहिली नाही. समुद्रांत बुडून गेली. तर मग आपल्या सारख्या सामान्य माणसाची काय कथा ? स्थिर राहणारा आपण रचलेला प्रपंच नव्हे तर देवाच्या करुणेने प्राप्त झालेला परमार्थ ! भक्ति, ज्ञान, वैराग्य !!

नवीन बांधलेले घर स्वर्गासमान भासते. पुढे मुले - बाळे नातवंडे, कर्ज - वगैरे झाले तर तेच नरक प्राय होऊन बसते. घरांत नव्याने येणाऱ्या सुनेला आपण 'गृहलक्ष्मी' म्हणतो. जावयाला नवरदेव म्हणतो जांवई बापू म्हणतो. पण पुढे ?

त्याचा अर्थ असा नव्हे कीं, घर म्हणा अथवा त्या घरांत राहणारे लोक बदलले. घर तेच आहे. घरांतील माणसे ही तीच आहेत. पण त्यांच्या भावना बदलल्या. हिमालयांतील उत्तुंग पर्वत शिखरें कांहीं वर्षांपूर्वी जशी होती; तशी आतां नाहीत. जड वस्तू मध्येंच इतके परिवर्तन घडते तर मग आपल्या भावना बदलल्याशिवाय कशा राहतील? आज आपल्या ज्या भावना अथवा विचार आहेत; ते पुढेही

तसेंच राहात नाहीत. हे जाणणे हीच सत्य दृष्टि होय !

आपण प्रेम भावनेने पाहिले तर हे जग सुखकर, सुंदर दिसते. भक्ति भावाने पाहिले तर तेच जग भगवंताने भरलेले वाटते. आनंदमय दिसते.

एक होता बौध्द मठ ! झेन गुरु त्या मठाचे अधिपति. ते वयोवृध्द, ज्ञानवृध्द ! हातांत एक काठी धरली होती. हिंवाळ्यांतील एक सकाळ. कोवळ्या उन्हांत सुखाने मठा बाहेर शतपावली करीत होते.

*एक श्रीमंत भक्त तेथे आला. गुरुना वंदन करुन म्हणाला,*

''गुरू महाराज, मला अंतिम सत्य-जाणून घ्यायची इच्छा झाली आहे. आपण परम अनुभावी आहांत. कृपा करून मला सत्य - साक्षात्काराचा मार्ग दाखवा !''

सत्य जाणून घ्यायची भक्ताचीअभिलाषा ऐकून गुरूना संतोष झाला. आपल्या हातांतील काठी त्याला देत गुरू म्हणाले,

*''घे हे सत्य !''*

*भक्त आश्चर्यचकित झाला. 'ही तर काठी आहे! सत्य कोठे आहे ?'*

''जे आहे; तेच सत्य हे ज्यांना समजले नाहीं त्यांना सत्य साक्षात्कार कसा होईल ?'' गुरू म्हणाले. त्याच वेळी भक्ताला परम सत्याचे दर्शन घडले !

आपण सत्यदृष्टीने पाहिल्यास सर्व कांहीं सत्य - शिव - सुंदर ! मधुर, मंगलकर ! तशी दृष्टि असणें हाच भक्तियोग होय !!

प्रत्येक पुरुष आपली पत्नी 'सति - सावित्री' असावी अशी अपेक्षा करतो. आपण मात्र 'सत्यवान' असायला हवे; हे विसरुन जातो. आपण स्वत: कसेही असलो तरी, हे जग मात्र सदा परिपूर्ण असावे, अशी आपण इच्छा करतो.

सत्य तेवढेच स्थिर, नित्य परिपूर्ण असते. अस्थिर जगत कधीही परिपूर्ण होणार नाही. म्हणूनच प्लेटो म्हणतो,

''परिपूर्णता ही केवळ वैचारिक आदर्श जगांतच पहावी. ती वास्तव जगांत नसते. त्यामुळें हे जगत् आदर्श जगाची छाया मात्र होय ! ''

भगवंतानेच या जगाची सृष्टि केली. त्यामुळें या जगांत येणारे सुख-दु:ख, जयापजय, स्तुती - निंदा सर्व कांहीं या भगवंताचा प्रसादच होय ! या भावनेने पाहिले तर हे सकल जग भव्य - दिव्य ! हीच सत्य - दृष्टि होय !

एका झाडावर एक कावळ्याचे घरटे. त्यांत कोकिळेने आपली अंडी ठेवली. पुढे अंड्यांतून पिले बाहेर पडली.वसंत ऋतुचे आगमन होतांच निसर्ग बहरला. कोकिळेच्या कंठांतून मधुर गीत प्रकटले.

वसंताचे भान नसलेल्या कावळ्यांनी कोकिळेला चोचीने टोचले. आपण कावळे काऽऽव काऽव असे समूह गान करतो आहोत. ही कुऽऽहू कुऽऽहू म्हणून अपस्वर काढते. ही आपल्या पैकी नव्हे. असे म्हणून कोकिळेला हाकलून दिले.

कोकिळा आकाशांत थोडे अंतर उडत गेली. विशाल आम्रवृक्षांत उतरली. मनसोक्त गाऊन तृप्त झाली. तेथें एक पोपट होता. तो म्हणाला,

''तुझा कंठ इतका मधुर असून सुध्दां त्या कावळ्यांनी तुझी हेटाळणी करायला नको होती. तुला वाळीत टाकायला नको होते.''

'' त्यांनी केले ते बऱ्यासाठींच केले.'' कोकिळा म्हणाली.

'' ते कसे ?'' पोपटाने विचारले.

''कावळ्यांच्या समूहांत मी इतके दिवस 'मी कोण आहे ?' हे विसरुन गेले होते. त्यांनीं मला आपल्या कळपांतून हांकून दिल्याने 'मी कावळा नव्हे. मी तर कोकिळा.' याचे ज्ञान मला झाले. ''कोकिळा म्हणाली.

कोकिळेचा हा भावच सुभाव ! तिची दृष्टी समदृष्टि, सत्य दृष्टि !! ही सत्य - दृष्टि, सत्य - प्रेम हीच भक्ति ! अशी सत्य दृष्टि असलेला सद्भक्त अस्थिर प्रपंचामागे धांवत नाही. नश्वर स्थान - मान, धन - संपदा मान - सन्मान यांची कांस तो कधीही धरीत नाही.

जपान देशांत एक झेन गुरु होते. वयोवृध्द ! मृत्यूशय्येवर पडले होते. त्यांच्या सभोवती शिष्य जमले होते. त्या गुरूचा उत्तराधिकारी आपण व्हावे असे एका शिष्याला वाटले. त्याने गुरूना विचारले,

''गुरु महाराज, आपला धर्म दंड कोणाला ?''

''तुलाच घे !'' असे म्हणून गुरूने आपला रिकामा हात पुढे केला.

''हा तर रिकामा हात ! धर्म दंड, अधिकार दंड कोठे आहे'' शिष्याने विचारले.

''ज्याला दिसत नाही त्याला देतां येत नाहीं'' गुरु म्हणाले.

तेथेंच असलेल्या दुसऱ्या एका शिष्याला बोलावून त्याच प्रमाणें रिकामा हात पुढे करुन गुरु म्हणाले ''घे हा धर्मदंड !''

''गुरुमहाराज मला क्षमा असावी. या धर्मदंडाची आवश्यकता मला नाही. या आधीच आपण मजवर कृपा करुन मला दिलेला सत्य दृष्टिदंड माझ्या हाती आहे.'' शिष्य म्हणाला.

''तूं धन्य आहेस !'' गुरु हर्षोद्‌गार काढीत म्हणाले. तेव्हां तेथे आत्मानंदाचा प्रकाश पसरला होता.!!

त्या शिष्याने धरलेला तो 'सत्य दृष्टि' दंड. गुरुने तो दंड देऊंनये ! आणि शिष्याने तो मिळविल्या शिवाय राहूं नये !! या सत्य दृष्टीने भक्ति योगाची भूमिका दृढ होते.!!



# - ९ -

# अद्वेष्टा

जीवन हे अत्यंत संकीर्ण ! सांसारिक संबंधांचे जाळे. हे जीवन संपूर्णपणें जाणून घेणें अथवा त्याला आपल्या इच्छेप्रमाणें रूप देणें अत्यंत कठिण काम !

एका बाजूला जड - जगाचा संबंध; दुसरीकडें जीव - जगाचा संबंध; तिसरीकडें मानव जातीचा संबंध; असे असंख्य संबंध आहेत. या सर्वांच्या मध्यें आपण जीवन कंठायला हवे. थोडासा जरी समतोल चुकला तरी संपूर्ण जीवन अस्त - व्यस्त होऊन जाते.

कॉम्प्यूटर किती अद्‌भुत काम करते. ते खोलून पाहिल्यास तेथे तारांचे जाळे, नकाशे. आपणांस त्या मध्यें कांहींच कळत नाही. तेथे थोडेसे जरी इकडचे तिकडे झाले तरी पुरे ! संपूर्ण यंत्र मौन होते. त्या यंत्रातील तारांचे जाळे एकमेकांवर इतके अवलंबून असते.

मानवी जीवन त्या कॉम्प्यूटर पेक्षांही जटिल, संकीर्ण गुंतागुंतीचे !!

एक माणूस 'जीवन म्हणजे काय ?' हे समजून घेण्यासाठीं निघाला. या प्रश्नाचे उत्तर नैसर्गिक परिसरांत मिळेल असे त्याला वाटले. अरण्यांत तो एका झाडापाशी आला. तेथें एक पोपट बसला होता. त्याला विचारले, ''जीवन म्हणजे काय?''

''जीवन म्हणजे सर्वांशी गोड बोलत संतोषाने राहणे.'' पोपट म्हणाला.

तो पुढे निघाला. तेथें एक सशाचे पिलू पळत आले. नुकतेच त्या सशाच्या आईने कोल्ह्याशी सामना करून आपले प्राण गमावले होते. सशाचे पिलू म्हणाले, ''जीवन म्हणजे संघर्ष. निरंतर युध्द !''

तो माणूस आणखी पुढे निघाला. त्याला भेटली एक हरिणि. त्याने हरिणीला विचारले, ''जीवन म्हणजे काय ?''

हरिणी म्हणाली, ''जीवन म्हणजे पळणे ! अन्नासाठीं; आश्रयासाठी, पाण्यासाठी, कशासाठी ही पळत सुटणें. पळून गेल्यास चार दिवस जगतां येईल. थांबलो कीं संपलो ! ''

तेथें एक नदी शांत पणें वाहत होती. त्याने विचारले. ''जीवन म्हणजे काय?''

नदी म्हणाली, ''जीवन म्हणजे सतत वाहात जाणें. वाहात राहिल्यानेच मी पवित्र झाले. इतरांना पवित्र करते.''

तोंपर्यंत दिवस बुडाला. सांज झाली. तो माणूस परत येत असतां त्याला एक घुबड दिसले. त्याने घुबडाला विचारले, ''जीवन म्हणजे काय?''

घुबड म्हणाले, ''जीवन म्हणजे केवळ बडबड करणें नव्हे, पळून जाणे नव्हे. झगडणे नव्हे. वाहात राहणें नव्हे. हे सर्व जीवनाचे एकेक मुख होय ! इतर प्राण्यांनी केवळ दिवसा जे जग दिसते. तेवढेच जग त्यांनी पाहिले आहे. देवाच्या दयेने मी दिवसा आणि रात्री असे दोन्ही जग पाहिले आहेत. मला इतकेच सांगायचे आहे कीं जीवन म्हणजे एक गूढ रहस्य ! ते संपूर्णपणें जाणतां येत नाही.''

असे हे जीवन सुंदर बनविणें हीच परम प्रेमरूप भक्ति होय ! या भक्तींला 'सत्य दृष्टि' असते. त्याचे दुसरे लक्षण 'अद्वेष' म्हणजे तो कधीही, कोणाचाही, कोणत्याही कारणास्तव द्वेष करीत नाही!

प्रेम हे अमृत ! द्वेष हे विष. प्रेम म्हणजे दिव्य प्रकाश ! द्वेष म्हणजे घन अंधकार ! हे दोन्ही कधी एकत्र असत नाहींत भक्ति-योग साधना करणाऱ्या साधकाच्या हृदयांत हे परम प्रेमामृत भरुन राहिले असतां चमत्कारच घडतो. त्याच्या हृदयांतून द्वेष संपूर्णपणें नाहीसा.होतो. म्हणून तो स्वप्नांतसुध्दां कधीही, कोणाचाही द्वेष करीत नाही. तो कोणावरही रागावत नाही. याचा अर्थ भक्ताच्या ठिकाणीं क्रोध अथवा कोप नसतो असे नव्हे. त्याच्या ठिकाणीं सुध्दां कोप असतो. पण तो प्रेमाला पूरक असा असतो.

बाळाला मातेचे दूध फारच आवडते. दूध म्हणजे त्याला अमृत ! या जगांत दोनच वस्तु दिसतात. एक वस्तु म्हणजे दूध. दुसरी वस्तु माता ! त्या बाळाला भेटायला प्रत्यक्ष देव जरी आला तरी तो मातेच्या अथवा दुधाच्या रूपाने आला पाहिजे ! असे असले तरी कधी कधी बाळाला आईवर आणि दुधावर राग येतो.

बाळ भुकेलेले असते. माता कोठे तरी गेलेली असते. मातेला यायला उशीर होतो. मातेने दुधाचा पेला भरुन ठेवलेला असतो. पण ते दूध मातेनेच पाजले पाहिजे असा त्या बाळाचा हट्ट असतो. बाळ रुसते. रागारागाने दुधाचा पेला लाथाडते. रागारागाने मातेकडे पाहते. याचा अर्थ बाळाला मातेवर अथवा दुधावर द्वेष आहे; असे नाही. त्याला थोडासा राग आलेला असतो. इतकेच.

बाळाचे हे रुसणें - फुगणें पाहून मातेला अधिकच आनंद होतो. राग हा संतोषाला कारण ठरत असेल तर तो कसला राग? राग नसलेला राग ! अशा रागासमवेत प्रेम जगते. त्या बाळाच्या ठिकाणीं राग आहे; खरे ! पण त्या रागावरही ताण करणारे प्रेम त्या बाळाच्या हृदयीं आहे. अशा प्रेमासमवेत येणारा राग अधिकच गोड असतो !!

प्रेमामुळें जीवनाचा विकास होतो. द्वेषामुळें जीवनाचा विनाश होतो. एक पूर्व तर दुसरे पश्चिम ! त्यामुळें ज्याच्या जीवनांत हा परम प्रेम रूपी भक्तिरस भरलेला असतो त्याच्या मनांत द्वेष कधीही येत नाही.

बसवेश्वरांच्या शरण समूहांत एक थोर शिवशरण घट्टिवाळय्या. त्याचे चारित्र्य शुध्द - निर्मळ. महात्मा बसवेश्वर, अल्लमप्रभु व वगैरे शिवशरण त्याचे पावन चरित्र पाहून भक्तिभावाने त्याच्या पुढे विनम्र होत. पण घट्टिवाळय्याच्या पत्नीचे पाऊल घसरले. ती व्यभिचारिणी झाली. अनेकांनी घट्टिवाळय्यांना सांगून पाहिले. '' अशा स्त्रीशी तूं कसा बरे संसार करतोस ?'' असे विचारले.

पण शरण घट्टिवाळय्यांना आपल्या पत्नीवर कोप आला नाहीं. त्यानी तिचा द्वेषही केला नाही. लोकांनी पुनः पुनः विचारल्यावर घट्टिवाळय्या म्हणाले,

''तुमचे सांगणे ऐकून मला माझ्या बायकोवर राग यायला हवा मी तिचा द्वेष करायला हवा. पण मी काय करुं ? माझ्या हृदयांत परम प्रेम रुप भगवद्भक्ति भरलेली आहे. अन्य भावनेला माझ्या हृदयांत स्थानच नाही. मी काय करुं? सांगा !''

प्रेम आणि द्वेष यांचे कधीही पटत नाही. म्हणूनच ज्यांनी विष पाजले; त्याना सुध्दां संतानी अमृतच पाजले. बसवेश्वरांनी चोरामध्यें सुध्दां कूडलसंगम देवाचेच रूप पाहिले. आपणांस सुळावर चढवून अंगभर खिळे ठोकणाऱ्यांना क्षमा करण्याची देवाकडे प्रार्थना केली येशू ख्रिस्ताने. ज्यांच्या अंतः करणांत प्रेमामृत भरले आहे; तेथें द्वेषाला कोठे स्थान आहे ?

एकदां एका संताने मधमाशीला विचारले,''तुझ्या मधामध्यें अमृता सम गोडी आहे.नांगीमध्यें मात्र विष भरले आहे.असे कां बरे ?''

मधमाशी म्हणाली, ''माझ्या नांगीमध्यें जे विष भरले आहे; ते कोणाला तरी द्वेषाने दंश करण्यासाठी नाही. माझ्या आत्मरक्षणासाठी आहें. संत महाराज आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवा. ती विषाची नांगी. द्वेषाची नव्हे.''

त्या मधमाशीच्या ध्यानी मनीं फुलांतील मधुर मकरंद भरलेला असतो. द्वेषाला तेथें स्थान नाही. तसेंच भक्ति - योग ! साधकाच्या ध्यानीं - मनीं सत्याचे प्रेम भरलेले असते. तो सदा - सर्वदा द्वेष रहित असतो. हीच अद्वेष्टावस्था होय !

भगवद्गीतेंत भक्ताचे लक्षण सांगतांना 'अद्वेष्टा' लक्षणच प्रथम सांगितले आहे.

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एवच !**
**निर्ममो निरहंकारः सम दुःख सुखः क्षमी !! गीता. १२ (१३)**

भक्तियोगी कोणत्याही प्राण्याचा द्वेष करीत नाही. सकल जीवराशी विषयीं स्नेह - करुणा त्याच्या हृदयांत असते. तो सुख - दुःखांत सम

भक्तियोगी कोणत्याही प्राण्याचा द्वेष करीत नाही. सकल जीवराशी विषयीं स्नेह - करुणा त्याच्या हृदयांत असते. तो सुख - दुःखांत सम - बुध्दि आणि क्षमाशील असतो.

जेथे अशा पवित्र प्रेमाची कमतरता असते तेथे द्वेष उचल खातो. वेगवेगळ्या जाती - मत - धर्म - देश यांमध्यें कलह उत्पन्न व्हायला प्रेमाची कमतरताच कारणीभूत असते. खरा धार्मिक माणूस - खरा भगवद् भक्त कधीही भांडण करायला तयार होत नाही. कारण तो सदा अद्वेष्टा असतो.





# - १० -
# निर्लिप्त

परमप्रेम हीच भक्ति ! जेथें प्रेम आहे; तेथें द्वेष नाही. स्वरूपत: प्रेम आणि द्वेष दोन्ही परस्पर विरोधी भावना. ज्या वस्तूवर आपण प्रेम करतो, त्या वस्तूचा द्वेष करतां येत नाही. ज्या व्यक्तीने अमृत पान करविले त्यास विषपान करवितां येणार नाही. एकाच वस्तूवर अथवा व्यक्तीवर प्रेम आणि द्वेष दोन्ही भावना एकाच वेळीं असूं शकत नाहीत. जर तसे असेल तर ते प्रेम खरे प्रेम नव्हे. अथवा तो द्वेष खरा द्वेष नव्हे.

माणूस हितकर वस्तूंवर प्रेम करतो. अहितकर वस्तूंचा द्वेष करतो. या जगांतील सर्व वस्तु हितकर आहेत; असे म्हणतां येत नाही. अथवा एक वस्तु नेहमी हितकर असते. असे म्हणतां येत नाही.

एकाच वस्तूवर दोघांचे प्रेम असेल तर त्या दोघांमध्यें द्वेषभावना उत्पन्न होते. इतिहासांत अशा भरपूर घटना आढळतात.

सुंद उपसुंद भाऊ - भाऊ ! देह दोन पण एक प्राण ! येवढे त्यांचे सख्य ! त्यांनी एकाच स्त्रीवर प्रेम केले. तिलोत्तमेवर ! त्या दोघांत द्वेषभावना उत्पन्न झाली. आपापसांत लढून दोघेही मरून गेले. तर मग जेथे प्रेम असते, तेथे द्वेष नसतो असे म्हणणे कितपत सत्य ?

खरे पाहतां जेथे प्रेम असते. तेथे द्वेष नसतो. पण परम - प्रेमा

विषयींच हे सत्य. सामान्य प्रेमांत 'अहं – मम' 'मी आणि माझे' भरलेले असते. परम प्रेमामध्यें सुध्दां 'मी' व 'माझे' हा भाव असतो. पण तो असून नसल्यासारखा. अत्यंत दुर्बल असतो. त्यामुळें तेथे द्वेषाचा प्रश्नच उद्‌भवत नाही.

सूर्योदयापूर्वी अरुणोदय होतो. पूर्व दिशेंत कसले अद्‌भुत दृश्य निर्माण होते. रुपेरी पडद्यावर, वज्राच्या कुंचल्याने, सुवर्णाचा रंग उधळीत, माणिक – मोत्यांची बरसात करणाऱ्या हृदयंगम दृश्यास पाहून कोणाला बरे आनंद होत नाही ? नित्य – नूतन असा अरुणोदय पाहून असंख्य जन संतुष्ट होतात. त्या अरुणोदयावर प्रेम करतात. पण त्यामुळें एकमेकांच्या हृदयांत द्वेष भाव उत्पन्न होत नाही. कारण अरुणोदयाच्या त्या सुंदर दृश्यावर कोणाचा हक्क आहे बरे ? सर्वांचाच ! त्यामुळें तेथें द्वेषाला स्थान नाही.

परिमित वस्तूचे प्रेम हे राग – द्वेषाला कारणीभूत ठरते. अपरिमित वस्तूवरील प्रेम परम पावन ! सामान्य प्रेम परिमित; वस्तु पुरतेच सीमित ! वस्तु परिमित असो; अपरिमित असो; सकल विश्वालाच गवसणी घालते परम प्रेम ! अशा परम प्रेम युक्त भक्ताच्या हृदयांतून द्वेष नाहीसा होतो. कारण त्याच्या ठिकाणी 'मी' आणि 'माझे' असत नाही.

एक तरुण साधक होता. एकदां तो प्रवासाला निघाला. वाटेंत मुसळधार पाऊस पडूं लागला. जवळच एक सुंदर घर होते. त्या घराच्या छपराच्या आश्रयाने, ओट्यावर तो तरुण बसला. त्या घरचा मालक दार उघडून बाहेर आला.

''आमच्या घराच्या ओट्यावर कां बसला आहेस? चल नीघ

येथून !'' असे त्या तरुणाला दरडावून सांगितले.

''ओ ऽहो ! हे तुमचे घर काय ? मला ते समजले नाहीं'' असे म्हणत तो तरुण सहजपणें उठून घरासमोरील झाडाच्या आश्रयाने उभा राहिला. वरून रिम झिम बरसात. सभोंवती हिरवीगार वनश्री. सारी प्रकृति पावसांत न्हाऊन ओली चिंब झाली आहे. हे स्वर्गीय दृश्य पाहून युवकाचे हृदय उचंबळून आले. तो गाऊं लागला.

तो घरमालक त्या युवकाचे गाणे ऐकून बाहेर आला. पावसांत भिजत असला तरी तो तरुण किती आनंदाने गातो आहे. मी या घरांत गेली साठ वर्षे राहतो आहे. पण त्या तरुणाला जसा आनंद झाला; तसा मला कां बरं झाला नाही? त्या तरुणामध्यें विशेष असा कांहीं गुण असला पाहिजे, असे म्हणून त्या तरुणाजवळ जाऊंन घरमालक म्हणाला,

''ये बाबा ! आमच्या घरासमोरच्या ओट्यावर बसून गा !''

''मालक ! मी येथेच आरामांत आहे. तुम्ही पण या. तुम्हांलाही आनंद होईल. ते घर तुमचे. हे घर सर्वांचे ! देवाचे घर !! तुमच्या घरांत तुम्हांला आनंद झाला असेल अथवा नसेल. पण देवाच्या घरीं सर्वांनाच आनंद ! या ! लुटा हा आनंद ! ''तो भक्तिं योगी म्हणाला.

हे प्रसन्न बोल ऐकून घरमालकाच्या हृदयांतील अहंकाराचा अंधार नाहीसा झाला. तो म्हणाला,

''आपण महान संत ! मी तुम्हांला ओळखले नाही. मला क्षमा करा ! कृपा करुन आपला आनंद - योग मला ही समजावून सांगा !''

''आपण या जगांत घर - दार, मुले - बाळे, गुरु - देव यांपैकी

कोणावर ही प्रेम करुं शकूं ! पण त्या प्रेमामध्यें ही वस्तु 'माझी' हा भाव अधिक नसावा. तेव्हां आपले जीवन मधुर होते!'' भक्ति साधकाने ही मधु - विद्या त्या घरमालकाला दिली.

हे मधुर बोल ऐकून तो घर मालक हर्ष भरित झाला. त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. ''मी धन्य झालो. आतां आपणच माझे गुरु ! ''घर मालक म्हणाला.

''माझा गुरु'' असे नका म्हणूं ! सहजपणें सत्याचा अनुभव घेऊन आनंदांत राहा !'' साधकाने घरमालकास सांगितले.

आतां घरमालकाचे डोळे पूर्ण पणे उघडले. सहज पणें तो अनिकेतन झाला. आनंद निलयांत त्याने प्रवेश केला.

असा भक्तिसाधक 'अद्वेष्ट' होऊन असतो. हे आपणांस समजले. त्याचे आणखी एक लक्षण 'निर्लिप्तता'.

माणसाच्या मनांतून 'माझे' हा भाव सोडविणें इतके सोपे नाही.एकंदरीत कोणत्या तरी एका वस्तूला चिकटून राहणें हा मनाचा विचित्र गुण होय ! वस्तु कितिही क्षुद्र असो; एकदां हे मन चिकटले कीं पुरे. प्राण जाण्याचा प्रसंग आला तरी मन त्या वस्तूमध्येंच रमते.

धर्मराजाचे मन द्यूताला चिकटले नव्हते काय? त्या द्यूताच्या मोहाने त्याने आपले राज्य - वैभव मान - सन्मान - गौरव सर्व कांहीं गमावले नाहीं काय ? त्यामुळें महाभारत युध्द होऊन अठरा अक्षौहिणी सैन्य नष्ट झाले ना ?

भक्तिरसाचे सेवन ज्याने केले; असा माणूस अशा नश्वर प्रापंचिक

विषयांना कधीही चिकटत नाही. इंद्रिय सुखाची आशा धरीत नाही.

अबू - बेन - आदम एक आदर्श संत.! त्याच्या पाशी घर - दार, पैसा - अडका कांही नव्हते. बायको - मुले नव्हती. एका लहानशा झोपडींत तो एकटाच राहात असे. त्याने एकच एक संपत्ति मिळविली होती. ती संपत्ति म्हणजे त्याच्या हृदयांत भरुन राहिलेले परिशुध्द प्रेम !

किडा - मुंगी, पशु - पक्षि, गरीब - श्रीमंत सर्वांवर तो समभावाने प्रेम करीत असे. अशा प्रकारें समस्त जगावर प्रेमाचा वर्षाव करीत तो सत्तर वर्षे जीवन कंठीत होता.

त्याचा अंतकाळ जवळ आला. एके दिवशीं रात्री अबू - बेन स्वत: शीच बोलत होता.

''प्रेम साम्राज्यांत जेवढा संतोष आहे;तेवढा अन्यत्र कोठेही नाही. जो पर्यंत मी जगेन, तों पर्यंत मी परिशुध्द प्रेमांतच राहीन''

असा विचार करीत अबूबेन झोपी गेला. त्याच्या स्वप्नांत देव आला. अबूबेन देवाला विचारतो;

''देवा! तूं कां बरे आलास?''

''तुझे प्रेमाने भरलेले जीवन पाहून मी प्रसन्न झालो आहे. तुला माझ्या राज्याला. स्वर्गाला घेऊन जाण्यास आलो आहे.'' देव म्हणाला.

''तुझ्या राज्यांत काय आहे ? संताने विचारले.

देव म्हणाला, ''तेथें केवळ सुख भरलेले आहे. तेथे दु:खाचा लवलेश सुध्दां नाही. तेथे सगळे पुण्य - पुरुष आहेत. सकल सुखोपभोग

त्यांच्या समोर हात जोडून उभे आहेत. कोणालाही कशाची ही कमतरता नाही.''

'तेथे माझे काय काम ?'' संताने विचारले.

''कांहीं नाहीं ! सुखांत राहणें येवढेच काम !'' देव म्हणाला.

संत म्हणाला, ''तर मग मी तुझ्या स्वर्गाला येणार नाही.''

देवाला आश्चर्य वाटले, ''सर्वजण स्वर्गाची अपेक्षा करतात. तूं कां बरे स्वर्ग नको असे म्हणतोस ?

''ज्यांना स्वर्गाची इच्छा आहे; त्यांना तूं घेऊन जाऊं शकतोस'. संत म्हणाला, '' मी तुझ्या स्वर्गाला मुळींच येणार नाही ! दीन: - दलितांचे, दु:खी - रोगी जनांचे अश्रु पुसत त्यांची सेवा करीत मी येथेच राहीन. तुझ्या स्वर्गाहून मला हे काम अधिक मोलाचे वाटते''.

या भूमिला स्वर्गाहून श्रेष्ठ ठरविले संताने. भक्तियोगी लौकिक विषयांत कधीही रमत नाही. तो सदा निर्लिप्त असतो.



## - ११ -

# निष्काम भक्ति

परम वस्तू विषयीं प्रेम हीच भक्ति ! अनुभावि पुरुषांनी त्या भक्ति रसाचे सेवन केले. सामान्य वस्तूविषयीं प्रेम म्हणजे राग. प्रापंचिक लोक शब्दादि विषय- वस्तूमध्यें रममाण होतात.

सामान्य वस्तूंच्या प्रेमाने संतोष होतो. त्या संतोषामुळें त्या वस्तू विषयीं मनांत आकर्षण उत्पन्न होते. हे आकर्षण अथवा ओढ म्हणजेच राग. रागामुळें मन विषयवस्तूंना चिकटते. सदा त्या वस्तूमध्येंच मन रममाण होते.

कधी कधी त्या वस्तू प्रत्यक्ष नसतात. तरी सुध्दां मन अप्रत्यक्षरीत्या असणाऱ्या त्या वस्तूच्या स्मरणांतच रमते - प्रेम उत्पन्न होण्यास ती वस्तु अंस्तित्वांत असावी लागते.वस्तु नसेल तर प्रेम तरी कसे असूं शकेल ?

भक्ताच्या हृदयांतील ती परम प्रेमाची वस्तु कोणती ? परवस्तु. परमात्मा नव्हे काय ? पण तो परमात्मा डोळ्यांना दिसत नाही. हाती गवसत नाही. मनाला वेद्य नाही. बुध्दीला अगम्य ! अशा निर्गुण निराकार परवस्तूवर प्रेम तरी कसे करतां येईल ? त्याची पूजा तरी कशी करावी ?

भक्ताच्या मनांत कोणत्याही प्रापंचिक वस्तू विषयीं प्रेम नाही. पर वस्तु वर प्रेम करतां येत नाही. म्हणजे भक्ताच्या परम प्रेमाला आश्रय होणारी एक सुध्दां वस्तु नाहीं. असे झाले. तर मग भक्ताचे परम प्रेम कशाच्या आधारावर  वाढेल ?

प्रेम करण्यास आश्रय अशी वस्तु नेहमी असलीच पाहिजे असे नाही. प्रेम करणें हा माणसाचा सहज स्वभाव, हृदयाचा मधुर भाव ! वस्तु नसली तरी हृदयामध्यें आपोआप प्रेम उत्पन्न होते. त्या प्रेमाला उपयोगांत आणल्यास ते व्यक्त होते. अन्यथा ते अव्यक्त असते. आत्मस्थ असते !

उदाहरणार्थ आपले ज्ञान ! मी एक वस्तु पाहतो. तेंव्हा माझे ज्ञान त्या वस्तूचे रुप धारण करते. पण मी कोणतीच वस्तु पाहिलेली नसते. तेव्हां माझ्या ठिकाणीं ज्ञान नसते असे नाही. असते. पण कोणत्याही वस्तूचे रूप धारण न करतां निराकार होऊन असते. त्याला चित्त म्हणतात.तसेंच सर्व मानवांमध्यें, सर्व जीवराशींमध्ये वस्तूच्या आश्रयाशिवाय असणारे प्रेम आहे. ते सहज प्रेम ! ते परिशुध्द, परिपूर्ण होय !

अय्या नीनु मैच्चिदडे, मेच्चु मेच्च दडे माणु;
आनु निन्नन्नप्पिदल्लदे सैरिसलारेनय्या.
अय्या नीनु ओलिदडे ओलि, ओलियदडे माणु
आनु निन्न पूजिसदे सैरिसलारेनय्या.
चेन्न मल्लिकार्जुनय्या,
आनु निम्मन्नर्चिसि, पूजिसि, हरूषदोळोलाडुवेनय्या।

''देवा, तूं ऐकणार असशील तर ऐक. नाहीतर सोड. पण मी तुझी कीर्ती गाइल्याशिवाय राहणार नाही. देवा, तूं पाहणार असशील तर पाहा. नाहीतर सोड. मी तुझ्या दर्शनाने हर्षभरित होऊन स्तोत्र केल्याशिवाय राहणार नाही. देवा तुला आवडो वा न आवडो, मी तुला उराउरी भेटल्याविना राहणार नाही. देवा तूं प्रसन्न हो अथवा सोड. मी तुझी पूजा केल्याविना सोडणार नाही. देवा चेन्नमल्लिकार्जुना, मी तुझी अर्चना करून, पूजा करून, हर्षातिरेकाने नाचेन, गाईन !'' महाकवि रविंद्रनाथ टागोर म्हणतात,

''हे देवा, माझ्या हृदयांत मी तुझ्यासाठी एक प्रेमाचे मंदिर बांधले आहे. ते स्वच्छ करून फुले आंथरली आहेत. दिवा पेटवून, दार उघडे ठेवून तुझ्या आगमनाची वाट पाहात आहे. तू कधीही ये. मला त्याची चिंता नाही. तुझी वाट पाहण्यांतच मला परम आनंद !''

एक भक्त देवाचे नाम स्तोत्र संतोषाने गात होता. एका संताने त्याला विचारले, ''इतक्या भक्तिभावाने देवाचे नामस्मरण करतो आहेस कां बरे?''

''संत महाराज, मला नामस्मरणांतच अपार आनंद मिळतो.'' भक्त म्हणाला.

''किती वर्षांपासून हे नामस्मरण करतो आहेस?'' संताने विचारले.

'' गेल्या पन्नास वर्षांपासून!'' भक्त म्हणाला.

''तर मग तुला देवाचे दर्शन?'' संताने विचारले.

''कोणाला हवे आहे देवाचे दर्शन?'' भक्त म्हणाला.

संताने आश्चर्याने विचारले, ''तूं देवाच्या दर्शनाविषयीं इतका निरिच्छ आहेस तर मग कां बरे येवढा भाव परवश होऊन नामस्मरण करतो आहेस?''

भक्त म्हणाला, ''देवाचे नामस्मरण करण्यांतच मला अपार आनंद होतो आहे. आतां तो देव आला तरी तेवढेच. न आला तरी तेवढेच! माझ्या परीने मी नामस्मरणांत जो आनंद मानतो आहे; तोच देव!'' हे सांगत असतां त्या भक्ताच्या मुखावर दैवी कळा प्रकटत असलेली संताला दिसली.

महान् विज्ञानी आईनस्टाईन यांना नोबेल पारितोषिक मिळाले. पण त्याविषयीं आईनस्टाईन एकदांसुध्दा बोलले नाहीत. लोकांनी विचारले, ''असे कां?'' आईनस्टाईन म्हणाले, ''मला सत्याचा शोध घेण्यांतच आसक्ती आहे. प्रशस्ति मिळविण्यांत नाही.''

सारे जग मान-सन्मानासाठीं कीर्तीसाठी धडपडते. पण भगवद्भक्त स्वप्नांतसुध्दां त्यांची इच्छा करीत नाही. हीच निष्काम भक्ति होय! या निष्काम भक्तीमध्येंच दिव्य आनंद! त्यांतच संतृप्ति!



# १२.

# ज्योति दर्शन !

आपल्या सभोवती अनेक वस्तु पसरल्या आहेत. त्यांच्याकडे लक्ष दिले तरच त्यांच्या अस्तित्वाचा आपणांस अनुभव होतो. मन आपणांस प्रिय अशा वस्तूंकडे वाहू लागते. जगांतील सर्वांत मोठी अथवा महत्वाची वस्तु आपली प्रिय वस्तूच आहे; असे वाटू लागते. तेव्हां अन्य वस्तु तितक्याच मोठ्या अथवा महत्वाच्या असल्यातरी त्या आपणांस दिसेनाशा होतात.

व्यापाऱ्याला या जगांत काय दिसते? एक पैसा आणि दुसरे गिऱ्हाईक. तेथे त्याचे जगच संपते. तसेच वैद्य, वकिल अथवा अन्य कोणालाही आपापल्या प्रिय वस्तु तेवढ्याच दिसतात. जगांतील अन्य वस्तु त्यांना दिसतच नाहीत.

मासा समुद्रांत जन्म घेतो. तेथेच वाढतो. जन्म काढतो. त्या माशाला सागरांतील इतर जलचर तसेच पाण्यातील वस्तु तेवढ्याच दिसतात. पण ज्याच्या अस्तित्वांतच त्या माशाचे जीवन अवलंबून आहे. तो सागर त्याला दिसत नाही. कां बरें ? त्या माशाचे लक्ष सागराकडे नसते! म्हणून कांही सागरच नाही असे म्हणता येत नाही. तसेंच आपणसुध्दा नित्य त्या सत्यरूपी सागरांत राहून सुध्दा त्या परम सत्याला जाणण्यास असमर्थ झालो आहोत. गगनचुंबी सिमेंट कॉंक्रीटच्या अनेक मजली इमारतींनी वेढलेल्या महानगरांत राहणाऱ्यांना आकाशाचे दर्शनसुध्दा घडणे दुरापास्त! सूर्योदय, चंद्रोदय कसा

असतो ? हे त्यांना माहितसुध्दा नसते. थंडी, वारा पाऊस, ऊन हे तर फ़ारच दुर्मिळ. आपल्या सभोवती पसरलेल्या लहान मोठ्या वस्तु आम्हांस ब्रम्हांडायेवढ्या मोठ्या वाटूं लागल्या तर परब्रह्म दूरच राहते. ती परम-प्रेम भक्ती तरी कशी लाभेल? अल्लम प्रभू म्हणतात,

ज्योति कंडा, इरलु कत्तले कंडा !
निधान कंडा, इरलु बडतन कंडा !
प्रसाद कंडा, कोंड्डे प्रळय कंडा !
गुहेश्वर कंडा इदु भ्रांतु कंडा !

*ज्योति आहे; पण अंधारही आहे, संपत्ती आहे; पण दारिद्र्यही आहे,*
*प्रसाद आहे पण प्रसाद स्वीकार केल्याने प्रलय आहे,*
*गुहेश्वर आहे ही भ्रांतिसुध्दा आहे.*

या वचनांत मंत्र सदृश चार वाक्यें सांगितली आहेत.

१) ज्योति आहे पण अंधार ही आहे.

परमेश्वररूपी ज्योति-परमज्योति सर्वत्र प्रकाश देते आहे. आदि पासून अनंतापर्यंत साऱ्या जगाला ती प्रकाशमान करत आहे. पाहणारे मन-डोळे नसल्याने आपण मात्र अंधारच पाहतो आहोत.

गांधारीभोवती प्रकाश पसरलेला असूनही तिच्या डोळ्यांसमोर मात्र अंधारच होंता. देवाने तिला आंधळेपणा दिलेला नव्हता. तिने आपण होऊन आंधळेपणा स्वीकारलेला होता. आपली परिस्थितीसुध्दां गांधारीपेक्षा वेगळी नाही. शेकडो प्रापंचिक व्यवहारांत आपण बुडून गेलो आहोत. डोके वर काढून बघायला सुध्दा आपणांस फुरसत नाही.

सत्याची ज्योति आपणांस दिसेनाशी झाली आहे. डोळे असूनसुध्दा आपण आंधळे आहोत. म्हणूनच अल्लमप्रभुदेवांनी आश्चर्य व्यक्त केले आहे, ''ज्योति आहे पण अंधारही आहे.''

२) निधान आहे - असूनही गरीबी आहे.

देवाने निर्माण केलेले हे जग भव्य, दिव्य! या मातीमध्यें - या प्रकाशात - या वाऱ्यात आणि पावसांत अपार शक्ति-संपदा भरून राहिली आहे. कशाचीही कमतरता नाही. हे न जाणल्याने यांचा सदुपयोग न केल्याने आपण गरीब राहिलो.

एका माणसाने गांवाबाहेर एक लहानशी झोपडी बांधली. तो तेथेच राहू लागला. पोटाला अन्न-पाणी नाही. अंगावर कपडा नाही. भीक मागून पोट भरे. त्याचा बाप आणि आजोबा भीक मागून खात त्याच झोपडीत राहात होते. तेथेच त्यांनी इहलोकीची यात्रा संपवली होती. आपल्या आजोबापासून - वडिलांपासून मिळालेला वारसा - भीक मागण्याचा, त्याने तसाच पुढे चालविला होता. त्यांतच तो म्हातारा झाला. हाती भिक्षापात्र घेऊनच तो मरण पावला.

त्याच्या अंत्य संस्कारासाठी लोक जमले. या माणसाला बायको-मूल कांही नव्हते. बेवारशी माणसाची झोपडी तरी कशाला शिल्लक ठेवा? असा विचार करून त्यांनी ती झोपडी पाडली. त्या भिकाऱ्याच्या अंत्यसंस्कारासाठी त्या झोपडीच्या जागेतच एक खड्डा खणला. खणत असताना खण्ण असा आवाज आला. सावधगिरीने खणून पाहतात तर काय? सोने, मोती, रत्नांनी भरलेला एक मोठा हंडा त्या जमिनीत सापडला. त्या अपार संपत्तीच्या राशीवर तीन-तीन पिढ्या ते भिकारी

झोपत असत. पण त्यांच्या नशीबी मात्र भीक मागणे सुटले नाही.

आपली रत्ने- ज्ञानरत्ने आपल्या आंत बाहेर सगळीकडे पसरली आहेत. त्यांना न जाणल्यामुळे आपण गरिबीत दिवस कंठतो आहोत. म्हणूनच अल्लमप्रभूनी म्हटले ,''संपत्ति आहे पहा, असूनही गरिबी आहे !''

३) प्रसाद पहा ! स्वीकारता प्रलय पहा !

हे सुंदर जग म्हणजे भगवंताचा प्रसाद. '' जीवजंतूवरील भगवंताचे प्रेमच जगाच्या रूपाने प्रकटले. '' असे बायबलमध्ये म्हटले आहे.

सुपीक जमीन, पाऊस, वारा, प्रकाश देणारा सूर्य, चंद्र, हे विशाल आकाश, हा निसर्ग; हे सर्व त्या भगवंताचा प्रेम प्रसाद होय.!

भगवद्‌रूप अशा या जगाला मानवाने युध्दभूमि बनविले. द्वेष पसरविला. प्रलय मांडिला. कुरूक्षेत्र हे खरे पाहता धर्मक्षेत्र. मानवाने त्याचे रणक्षेत्र बनविले. जेथे दुधाचे पाट वाहात होते; तेथे रक्ताचे पाट वाहू लागले.

भगवंताची सृष्टि केवढी समृध्द ! किती प्रकारची रसाळ मधुर फळे ! गोड मध ! हे भव्य भूमंडल म्हणजे विविध रसांची मेजवानी. ही मेजवानी आपापसांत वाटून प्रेमाने अनुभवणे, माणसाला जमले नाहीं. भूमीवर आपले स्वामित्व स्थापन करण्यास किती युध्दे केली; केवढा सर्वनाश घडविला. ही भूमी म्हणजे भगवंताचा प्रसाद आहे, हे न जाणल्याने अनंत दुःखांना, प्रलयांना कारणीभूत ठरला. म्हणूनच प्रभुदेव म्हणतात, ''प्रसाद पहा !स्वीकार करतां प्रलय पहा !''

## ४) गुहेश्वर पहा ! ही भ्रांति पहा !

'' सर्व खल्विदं ब्रह्म !'' हे सर्व ब्रह्मच होय ! हे एक महावाक्य. या सृष्टीच्या अणु-रेणु-काष्ठ-पाषाणांत भगवंत भरून राहिला आहे. जगातील सर्व वस्तूंच्या अंतरंगात आणि बहिरंगात तोच भरून राहिला आहे. सर्व वस्तूंचे केंद्र, परीघ, सर्वस्व तोच आहे ! त्याचा विस्तार ''जगाएवढा - आकाशाएवढा सर्वांच्याही पलीकडला'' असे महात्मा बसवेश्वर म्हणतात. अक्कमहादेवी म्हणते,

वनवेल्ला नीवे! वनदोळगिन तरूमरादिगळेल्ला नीवे!
तरूविनोळगाडुव खग मृगादिगळेल्लवु नीवे!
चेन्नमल्लिकार्जुना! सर्व भरितनागि एनगे मुख दोरा!

''हे सर्व वन म्हणजे तुम्हीच.या वनात तरू-मृगादि सर्व कांही तुम्हीच.

चेन्नमल्लिकार्जुना, सर्वभरित होऊन मला दर्शन दे!

विश्वाच्या सकल वस्तूंमध्ये भगवंताचे अधिष्ठान आहे. हे सत्य आहे. आपणांस मात्र मिथ्या वस्तूच दिसतात. सत्यरूपी देव दिसत नाही! मिथ्या जगालाच आपण सत्य समजतो. ही भ्रांति नव्हे तर काय? अल्लमप्रभु म्हणतात ''गुहेश्वराला पाहिले! ही भ्रांति पाहिली!''

भगवंत हा परंज्योति, खरी संपत्ती, परम प्रसादरूप! सर्वत्र असणाऱ्या या भगवंताविषयी परिशुद्ध प्रेम बाळगणाराच खरा भक्त होय!



# १३.
# जाणीव नेणीव

भगवंत बहिरंगात सकल सृष्टि होऊन प्रकट झाला. आपल्या अंतरंगात तोच हृदयातील माधुर्य होऊन राहिला. तिकडे लक्ष नसल्याने भगवत्प्रेमाचे भान येत नाही. आपल्या हृदयांत असलेले परम प्रेम अनुभवणे, हीच भक्ति होय!

हजारो वर्षापासून येथे कितीजण संत-महंत होऊन गेले. भगवद्भक्तीचा महिमा आणि वैभव यांचा उपदेश त्यांनी केला. आपण तो उपदेश ऐकून, ऐकून विसरलो. या जगांत सत्याचा विसर पाडणाऱ्या घटना असंख्य!

एक होता तरूण! सशक्त आणि सुंदर! सुसंस्कारी! त्याने मोठ्या श्रद्धेने गुरूसेवा केली होती. सदा तो गुरूसानिध्यांतच राहात होता. एके दिवशी तो गुरूसमवेत प्रवासाला निघाला. उन्हाळ्याचे दिवस. चालून चालून गुरूशिष्य थकले. तेथे एक ओढा होता. त्या ओढ्याच्या काठावर एक झाड होते. त्या झाडाखाली ते येऊन बसले.

गुरूने शिष्याला सांगितले, ''जवळच एक गांव आहे. तूं लौकर जाऊंन भिक्षा मागून घेऊन ये! येथेच आपण भोजन करून विश्रांती घेऊन पुढे जाऊं या!''

''जशी आपली आज्ञा!'' असे म्हणून शिष्य भिक्षा मागायला गेला. त्याने गावांत प्रवेश केला. चार घरांत भिक्षा मागितली. ''आणखी

एका घरांत भिक्षा मागितली की पुरे! आपण माघारी जायचे'' असे म्हणून तो पाचव्या घरी गेला. तो एक मोठा वाडा होता.

''भवति भिक्षां देहि!'' त्याने मोठ्या आवाजाने आरोळी ठोकली. घरांतून एक तरूण सुंदरी भिक्षा घेऊन आली. तिचे अप्रतिम लावण्य पाहून तो तरूण शिष्य स्तंभित झाला. पुनः पुनः पाहून त्याची तृप्ति होईना. तो पाहातच राहिला. ''मी कोण आहे? मी कोणत्या उद्देशाने येथे आलो आहे?'' हे सर्व तो विसरून गेला. त्या तरूणीच्या पित्याला त्याने आपले मनोगत कळविले. त्या पित्याला वाटले, तो तरूण आपल्या उपवर कन्येला योग्य वर आहे. लग्न झाले. प्रपंचाला प्रारंभ झाला. दोन मुले झाली. सुखाचा संसार सुरू झाला.

एके दिवशी पति-पत्नीमध्ये थोडासा वाद-विवाद झाला. पत्नी म्हणाली, ''तुम्ही थोडा तरी विचार केला पाहिजे! आज तुम्ही हे घर ही संपत्ती आपली स्वतःचीच मालमत्ता समजून बोलतां आहांत! तुम्ही एके दिवशी झोळी घेऊन या दारांत उभे राहिला होतांत, हे विसरला आहांत काय?''

तरूण शिष्याला सर्व कांही आठवले. ज्ञानाचा सागर अशा आपल्या गुरूला शोधायला तो निघाला. गुरूच्या सानिध्यात असणाऱ्या शिष्याची ही अवस्था तर मग........ ?

विषयांच्या आकर्षणाने माणूस वाहवत जातो. परम सत्य; परम प्रेम तो विसरतो. भक्तीचे पर्यवसान जी मुक्ति, ती गमावतो. आपणाला कधीही सत्याचा विसर पडू नये! त्यासाठी आपण नित्य ज्ञानी जनांच्या संगतीत रहावे. ह्राच सत्संग होय! सत्संग तीन प्रकारचा. १) संतांचा

संग २) निसर्ग संग ३) स्मरणाचा संग.

१) संत-संग :- साधु-संत, शिवशरण ज्यावेळी येथे प्रत्यक्षपणे असतात त्यावेळी आपण त्यांच्या सानिध्यात असावे.श्रद्धेने-भक्तीने त्यांची सेवा करावी. त्यांची अनुभवाची वाणी श्रवण करावी. त्या वाणीमध्ये दैवी प्रकाश भरलेला आहे. तो प्रकाश आपल्या मनांतील अंधार दूर करतो. विषय लालसा दूर होते. सत्याचे ज्ञान उत्पन्न होते. परम प्रेम अनुभवाला येते. हीच भक्ती होय!

महात्मा बसवेश्वर प्रधानमंत्रि होते. तरी पण नित्य शरणांच्या सत्संगाचे आयोजन करीत असत. त्यासाठी त्यांनी अनुभव मंटपाची स्थापना केली. **''शिवशरणांचे आगमन मज प्राणांहुनी प्रिय!''** या भावनेने त्यांनी शरणांचे स्वागत केले. **''कुडल संगम देवाला जाणण्यास शरणांचा संगच मूळ''** असे त्यांनी सांगितले.

अल्लम प्रभु,चेन्नबसवेश्वर, अक्कमहादेवी, सिद्धरामेश्वर इत्यादि शरण आत्मज्ञानी होते. शाश्वत सत्याचे-परमात्म्याचे ज्ञान त्यांना झाले होते. ''आपणांस आत्मसाक्षात्कार झाला आहे; आतां सत्संगाची आवश्यकता काय आहे?'' असे त्यांना वाटले नाही. सर्व शरण आपले दैनंदिन कायक पूर्ण करून अनुभव मंटपाकडे धांव घेत. सतत शरणांच्या संगतीमध्ये-भगवत् चर्चेमध्ये भाग घेऊन ते धन्य झाले.

२) निसर्ग संग :- विशाल असा भू-प्रदेश, हिरवी गार वनश्री, स्वच्छ पाण्याने भरून वाहणारी नदी, पावसाची रिमझिम, थंडगार वाऱ्याची झुळुक, अनंत आकाश ही सर्व निसर्गाने मानवाला दिलेली संपत्ती!

निसर्गाच्या या पवित्र परिसरांत आपोआप दैवी भाव उत्पन्न होतो.

आपल्या पूर्वकालीन ऋषि-मुनींनी निसर्गाच्या सानिध्यातच दीर्घकाळ भगवच्चिंतन केले. तपश्चर्या केली. भगवंताचा साक्षात्कार त्यांना निसर्गाच्या सहवासांतच घडला. आपण सुद्धा शक्य तितका काळ निसर्गाच्या संगतीत राहिलो, तर आपणांस भगवंताचे दर्शन घडेल. आत्मसाक्षात्कार होईल.

सूफी संत निसर्गाच्या संगतीतच राहात असत. धो धो पाऊस पडूं लागला, की त्या पावसांत आनंदाने गाऊन नाचून भगवंताच्या प्रेमाचा अनुभव घेत असत. त्यांच्या दृष्टीने पाऊस, वारा, प्रकाश ही सर्व भगवंताची रूपे होत!!

३) स्मरण संग :- हा आंतरिक संग होय. साधु संत जेव्हा प्रत्यक्ष पणे नसतात तेव्हां त्यांच्या उपदेशामृताचे स्मरण करणे, त्यांच्या अनुभवाच्या ग्रंथांचे पठण करणे, अध्ययन करणे, ध्यानस्थ राहून गुरू आणि देवाच्या मूर्तीचे स्मरण करणे हे सर्व स्मरण संग होय!

स्मरण संगाने आपले मन निर्मळ होते. प्रापंचिक आकर्षणे गळून पडतात. तेव्हां परम प्रेम अनुभवाला येते. तीच भक्ति होय!

या विविध संगाने विस्मरणाचा अंधार नाहीसा होतो. ज्ञानाचा प्रकाश पसरू लागतो. तेव्हां परम प्रेम रूपी सुमन उमलते. तीच भक्ति होय! यामुळे मानव-देवमानव होतो. तोच शरण! तोच साधु! तोच संत!

### अरिदोडे शरण, मरिदोडे मानव

''जाणिले तर शरण, विसरले तर मानव'' असे बसवेश्वरांनी म्हटले आहे.



# १४
# सत्संग

**घनके घनवाद वस्तु ताने गुरूवाद**

**ताने प्रसादवाद, ताने मंत्रवाद, ताने सकल विद्यासागर नाद !**

''घनाला घन वस्तु म्हणजे परब्रह्म, परमात्मा. तोच गुरू झाला. तोच प्रसाद झाला, तोच मंत्र झाला. तोच सकल विद्यासागर झाला.''

अल्लमप्रभु देवांच्या वचनाचा एक भाग हा! यांत परमात्म रूपाचे, तात्विक स्वरूपाचे वर्णन केले आहे.

वस्तूंमध्ये दोन प्रकार १) स्वावलंबी २) परावलंबी. जी वस्तु स्वतंत्र आहे; आपल्या अस्तित्वासाठी दुसऱ्या वस्तूवर अवलंबून नसते ती परवस्तू, परब्रह्म! परमात्मा! तीच स्वयंभू!!

या उलट जी वस्तु अस्वतंत्र असते, आपल्या अस्तित्वासाठी अन्य वस्तूंवर अवलंबून असते. ती परावलंबी, अपूर्ण, प्रापंचिक

हे फूल पहा! ही परावलंबी वस्तु. ही वर्ण, सुगंध, मकरंद, आकार आदि गुणांनी युक्त आहे. उमलणे, कोमेजणे, वाळणे इत्यादि क्रियांना हे फूल बाध्य आहे. या गुण-क्रियांना सोडून या फुलाला स्वतंत्र अस्तित्व नाही. एवढेच नव्हे तर या फुलाला सोडले तर या गुण क्रियादींना सुद्धा स्वतंत्र अस्तित्व नाही. त्यामुळे हे फूल परावलंबी! या फुलाप्रमाणेच या जगातील अन्य वस्तु!!

स्वयंभू अशी परवस्तु परिपूर्ण आहे. अत्यंत विशाल घन आहे. ती परवस्तु या विशाल जगालासुद्धा व्यापून राहिली आहे. म्हणून ती घनाला घन ! गुहेश्वर ! ती परवस्तु अमूर्त आहे. त्या परवस्तूला देवळांत-मंदिरात बंद करून ठेवतां येत नाही ! ती तोडतां फोडतां येत नाही. या वस्तूला माता-पिता नाहीत्. जनन-मरण नाही. नित्य परिपूर्ण सत्-चित्-आनंद स्वरूप अशी ती वस्तु !

घनाला घन होऊन राहिलेली वस्तूच त्रिविध रूपामध्ये अभिव्यक्त झाली! ज्ञानरूपी गुरू होऊन, प्रसादरूपी जगत होऊन,मंत्ररूप सृष्टि होऊन ती प्रकट झाली !

शरणांच्या-संतांच्या दृष्टीने पाहिले तर हे जगत म्हणजे भगवंताचा प्रसाद होय! भगवंतच जगाची भोग्यवस्तु झाला. म्हणूनच अन्न झाला, पाणी झाला, सर्व भोग्य वस्तु झाला. येथील शब्द-पवित्र, स्पर्श-पवित्र, रूप-रस गंधादि सर्व पवित्र. पवित्र वस्तूंचा पुंज म्हणजेच हे जगत्! म्हणूनच आपणांस या जगातील प्रत्येक वस्तु पवित्र, देव होऊन दिसली तर त्याला प्रसादीकरण असे म्हणतात. या प्रसाद दृष्टीमुळे भक्तीला शक्ति लाभते!!

बहिरंग सृष्टि प्रसाद झाल्यास, अंतरंग सृष्टि मंत्र! आपल्या ठिकाणी असलेले भाव-स्पंदन, विचार-स्पंदन, कल्पना-स्पंदन हे सर्व निश्शब्द ब्रह्माचे अभिव्यक्त मंत्रजाल होय! त्यामुळे आपल्या आंत बाहेर सर्वत्र तो पवित्र देवच भरून राहिला आहे.

एका बाजूला घनाला घन म्हणजे पूर्णाला-परिपूर्ण अशी वस्तु! दुसऱ्या बाजूला प्रसादमय जगत्! आणखी एका बाजूला मंत्रमय अंतरंगाची सृष्टि! या तिन्हींच्या मध्यें अवतरला तो महागुरू ! तो या

भव्य जगाला पाहून; दिव्य अशा भगवत्कारूण्याचा अनुभव घेतो. त्याच्या श्रीमुखातून बाहेर पडलेली वाणी हीच सकल-विद्या-सागर झाली! या गुरूमध्ये आणि देवामध्ये कांही फरक नाही. तो देवच चालता फिरता लिंग, बोलता लिंग होऊन; या जगाला पावन करणारा गुरू देव होऊन राहिला !!

त्या महागुरूची वाणी श्रवण करणे, स्मरण करणे हेच स्वाध्याय-प्रवचन होय! तो गुरूपदेश प्रत्यक्षपणे-अप्रत्यक्षपणे ऐकून-अनुभव घेऊन आनंद प्राप्त करून घेणे हाच सत्संग होय! हा उपदेश पाजून आपल्या अंतरंगाला उजळविणाऱ्या महात्माच्या सत्संगाची शक्ति अवर्णनीय!

भगवान बुद्ध एके दिवशी सायंकाळी सत्संगात बसला होता. भिक्षु संघ त्याच्या समोर बसला होता. बुद्धाचा उपदेश उघड्या मैदानात, शांत आणि सौम्य वातावरणांत सर्वांच्या अंत:करणावर परिणाम करीत होता. कोणालाही मंत्रमुग्ध करून टाकण्याचे शून्य वातावरण!

तेथे एक स्त्री आली. तिचे नांव होते आम्रपाली. ती एक गणिका होती. श्रीमंत गणिका! बुद्धाच्या दर्शनाला सगळा गांव लोटला होता. तीही कुतुहलाने तेथे आली होती.

शांत-स्तब्ध वातावरणांत शून्य मनांतून बुद्धाचा उपदेश स्रवत आहे. ''मी बुद्ध'' हा भाव त्याच्या ठिकाणी नव्हता. समोर बसलेले लोक गरीब आहेत ? की श्रीमंत आहेत? स्त्री आहे की, पुरूष ? वृद्ध आहे की, तरूण? ही कसलीच भावना नव्हती. अमनस्कावस्थेतून अस्खलित वाणी वाहात होती. शून्यालाच देव म्हटले तर त्याच्या दिव्य वाणीत देवच भरला होता.

आम्रपाली शांतपणे ऐकत होती. सूर्यास्त झाला होता. संध्याप्रकाश मंदावत होता. वरून चंद्राचे शीतल चांदणे पसरू लागले. बुद्धाच्या अमृतवाणीचा दिव्य प्रकाश त्या चांदण्याच्या शीतल प्रकाशात मिसळून परिसर अत्यंत पवित्र झाला आहे. बुद्धाचा उपदेश ऐकतां ऐकतां आम्रपाली आपले देहभान विसरली.

''निर्वाणाच्या क्षेत्रांत सर्वांना मुक्त प्रवेश आहे. तेथे पाप नाही. पुण्य नाही. गरीब-श्रीमंत, उच्च-नीच भेद नाही. या शांति सागरांत आनंद मिळविण्यास सर्वांनाच समान अधिकार आहे.''

या अमृत वाणीच्या श्रवणाने आम्रपालीवर अद्भूत परिणाम झाला. आजपर्यंत ती स्वत:ला पापी समजत होती. ''आपणांस निर्वाण लाभू शकतो! आपण देवक्षेत्रांतप्रवेश करूं शकतो ; पवित्र क्षेत्रांत जाऊ शकतो.'' असा आत्मविश्वास तिच्या मनात उत्पन्न झाला.

बुद्धाचे प्रवचन पूर्ण झाले. लोक हळू हळू बुद्धाला नमस्कार करून दूर सरकू लागले. आम्रपाली दृढ विश्वासाने उठली. बुद्धाजवळ गेली.

''बुद्धं सरणं गच्छामि'' असे म्हणत तिने नमस्कार केला.

''कोण आहेस तूं ?'' बुद्धाने विचारले.

''तुमचा उपदेश ऐकण्यापूर्वी मी गणिका होते.'' आम्रपाली म्हणाली, ''आतां मी निर्वाण पथिक!'' आपण गणिका होतो याचा आम्रपालीला पूर्ण विसर पडला. आतां ती खरोखर निर्वाण पथिक होती. मुमुक्षु होती.

''भगवान! कृपा करून तुम्ही माझ्या घरी प्रसादाला यावे.'' तिने बुद्धाला प्रार्थना केली. भगवान बुद्धाने मागे पुढे न पाहतां म्हटले

''तथास्तु!''

गणिकेच्या घरी प्रसाद घ्यायला बुद्ध तिच्या घरी जाणार आहे या बातमीने लोकांत खळबळ माजली. मनाला येईल तसे लोक बोलूं लागले. कोणाच्याही बोलण्याकडे लक्ष न देतां बुद्ध आम्रपालीच्या घरी भिक्षेला निघाला. निर्वाणच मूर्तिमंत होऊन चालत यावा, तसा बुद्ध चालत तिच्या दारी आला. त्या गणिकेची भक्ति पाहून तिच्यावर प्रसन्न होऊन; तिच्या दारांत उभा राहून बुद्धाने आपले भिक्षापात्र - जगाचे रक्षापात्र - मोक्षपात्र पुढे केले.

बुद्धाच्या भिक्षापात्रात लोक आहार वाढत असत. आम्रपालीने आपली संपूर्ण संपत्ति-सर्वस्व बुद्धाच्या चरणीं अर्पण केले.

''मी भिक्षा मागायला तुझ्या दारी आलो.'' बुद्ध म्हणाला. ''तुझी संपत्ति मागायला आलो नाही मी!''

''मला ते माहित आहे!'' आम्रपाली म्हणाली. ''भगवान बुद्धांना धन मिळवायची आशा नाही. आमच्या सारख्या पतितांचा उद्धार करायला-आमचे हृदय स्वच्छ करायला, आपण आला आहांत पण माझे कर्तव्य मी केले आहे. मी सर्वस्व तुमच्या चरणांशी वाहिले आहे. आतां तुम्ही आपल्या मनाला योग्य वाटेल तसे करा!''

''पुन: एकदां विचार करून पहा!'' बुद्ध म्हणाला.

''मी खूप विचार केला आहे!'' आम्रपाली म्हणाली. ''आतां मी निर्वाण पथिक ! आतां माझे असे कांहीही नाही. सर्व कांही बुद्धाचेच.''

''मी स्विकार केला तरच ना, ही संपत्ति माझी?'' बुद्धाने विचारले.

''होय! मी परत घेतले तरच ही संपत्ति माझी! होय ना ?'' आम्रपाली म्हणाली.

''तुझीही नव्हे आणि माझीही नव्हे. तर मग ही संपत्ति कोणाची ?'' बुद्धाने विचारले.

'' ती शून्याची संपत्ति! आम्रपाली म्हणाली.

एकाच दिवसाच्या सत्संगाने आम्रपालीमध्ये केवढे परिवर्तन झाले होते ! आता आम्रपाली सर्वसंग परित्यागी! पवित्रात्मा झाली होती. निर्वाणाची पथिक झाली होती. आम्रपालीचे आम्रवन आतां बुद्धवन!!

परम प्रेमरूप भक्तीच्या अभिवृद्धीला प्रेरक हा सत्संगच! सकल साधनेचे मूळ म्हणजे सत्संग! भक्तीचे बीज अंकुर फुटून वाढून अमृत फल द्यावयास सिद्ध व्हायचे असेल तर सत्संग आवश्यक!

म्हणूनच बुद्ध, बसव, शंकर या सर्वांची वाणी आपण नित्य श्रवण करावी. त्यामुळे आपले जीवन विकसित होते. मन घन-मन-पूर्ण मन होते. सत्याचे सामिप्य लाभते. तेच सत्संगाचे मधुर फल होय!



# १५
# आसक्ति

भक्ति हा अत्यंत मधुर भाव ! तो विकसित होऊन, निस्सीम, परमोन्नत अवस्थेप्रत जायला हवा. कांही पोषकांश असतील तर ते साध्य होते. भक्तीला अत्यंत अनिवार्य आणि महत्वाचा पोषकांश म्हणजे सत्संग!

वाल्मिकी पूर्वाश्रमांत एक दरोडेखोर होता. त्यावेळी त्याच्या डोळ्यांत क्रोध, हातांत क्रौर्य, मनांत हिंसा होती. अशा वाल्मिकीला नारदमुनींचा सत्संग लाभला. केवढे अगाध परिवर्तन घडले!

त्याच वाल्मिकीच्या हृदयातून हिंसाभाव शाश्वतपणे नाहीसा झाला! अनंत माधुर्य भाव भरून राहिला! डोळ्यांतून क्रोध उतरला. अप्रतिम शांतिरस भरून राहिला. हातांतील क्रौर्य नाहीसे होऊन अमर काव्य वाहूं लागले. त्याच्या शब्दांमध्ये नि:शब्द ब्रह्मच भरून राहिला. इतिहासात अशा हृदय परिवर्तनाच्या घटना विरळच! अंगुलीमाला, नामदेव अशा बोटावर मोजण्या इतक्याच. सत्संगामध्ये केवढी अद्‌भूत शक्ति भरून राहिली आहे!

येशू , बुद्ध, बसव, महावीर, शंकर अशा थोर पुरूषांचा सत्संग आपण करावा; हे खरे ! पण असे महान पुरूष कितीजण आहेत ? हातावर मोजण्याइतकेच ना ? तर मग आम्हां सर्वांना सत्संग कसा बरे लाभेल ? ही कांही जणांची समस्या !

कोणत्याही क्षेत्रांत श्रेष्ठ पुरूष विरळच! हरिदासासारखे संगीततज्ञ, मायकेलेंजेलो सारखे कलाकार किती जण आहेत? उत्तुंग एवरेस्ट शिखर चढून गेलेले किती जण आहेत? तेनसिंग, हिलेरो सारखे बोटावर मोजण्याइतकेच. त्याचप्रमाणे अत्यंत दुर्लभ अशा अध्यात्म विद्येमध्ये सत्याचे परमोन्नत शिखर चढून गेलेले संत अत्यंत विरळ असणे साहजिक आहे !

कौशिक महाराजाने अक्कमहादेवीला पट्टराणी बनवायचे प्रलोभन दाखविले, तरी तिने ते नाकारले. राजकुमारी मायादेवीने अल्लम प्रभुदेवावर भाळून त्याला कितीही प्रलोभने दाखविली तरी त्या योगेश्वराने तिचा अव्हेर केला. अक्कमहादेवी, अल्लमप्रभु यांना लाभलेली विरक्ति किती लोकांना साध्य झाली?

उत्तर ध्रुव प्रदेशांत हिवांळ्यात सूर्याचे दर्शन घडतच नाही. अरबस्तानांत कोणत्याही ऋतूंत पाऊस पडणे अपूर्वाईच. असे असून सुद्धां तेथे पशु पक्षी, जीवराशी जगतातच ना? जनजीवन चाललेच आहे. ज्याची कतमरता आहे; त्या वस्तूचा उपयोग जरूरी पूरताच करून जगणे ही एक कलाच. तसेच अध्यात्म क्षेत्रांत क्वचितच असणाऱ्या संतांच्या-शरणांच्या संगाने आपले जीवन पावन करून घेणे शक्य आहे. तशा सज्जनांचा-संताचा-शरणांचा संग लाभावा अशी आसक्ति आपल्यां मनांत असावी लागते. महात्मा बसवेश्वरांना जसे शरणांचे आगमन प्राण-जिव्हाळा वाटे; तसे आपणांस सुद्धा साधु संतांचे आमगन प्राण-जिव्हाळ्याचे व्हावे. असे साधु-संत-शिवशरण आपणांकडे आले नाहीत, तर आपण स्वतःच त्यांना शोधत जाण्याइतकी तीव्र आसक्ति आपल्या मनांत उत्पन्न झाली पाहिजे.

एक शेतकरी शेताला गेला. खिशांत हात घालून पाहिले. बिडी नव्हती. त्याला जोराची तलफ आली. जीव राहीना. उठला. आजूबाजूच्या शेतकऱ्यांकडे गेला. त्याच्या दुर्दैवाने त्या दिवशी कोणीही बिडी आणली नव्हती. त्याची घोर निराशा झाली. आतां तो गांवाकडे निघाला.

येतांना वाटेत त्याला 'कोणीतरी भेटले. त्याचा जीव भांड्यात पडला. पण ते होते महात्मा! कोणी असले तरी काय? त्यांच्याकडे सुद्धां याने बिडी मागितली. साक्षात भगवंतच त्याच्या समोर आला असता, तरी त्याच्याकडे सुद्धा याने बिडीच मागितली असती की काय कोण जाणे ?

आरोग्य बिघडवून टाकणाऱ्या बिडी विषयी माणसाच्या मनांत एवढी तीव्र आसक्ति! तर मग सत्याचा साक्षात्कार करून देणाऱ्या, भवरोगांपासून मुक्त करून जीवन्मुक्त करणाऱ्या साधु-संतांच्या-शरणांच्या संगासाठी किती तीव्र आसक्ति बाळगावी लागेल ? एक जांवई शोधायला मुलीचा बाप किती तरी खटपट करतो. देशोदेशी शोध घेत जातो. तर मग देवाचा ही देव जो गुरू, त्याचा शोध घ्यायला किती त्याग करावा लागेल ? सत्संगाविना सद्गति नाही. चिरशांति नाही, ही जाणीव आपणांस व्हावी. तेव्हांच सत्संगाविषयी तीव्र आसक्ति उत्पन्न होते !

सत्संग करावा खरा ! पण अशा योग्य साधु-संतांना, शरणांना कसे ओळखायचे ? ते कांही श्रीमंत नव्हेत. विश्वविद्यालयाचे पदवीधर-विद्वान नव्हेत. सिनेमा नटांप्रमाणे रूपवान नव्हेत. दारासिंग सारखे सशक्त नव्हेत. ते कांही जरी असले तरी; ती त्यांची बाह्य लक्षणे.बाह्य

लक्षणांनी त्यांना ओळखतां येत नाही. संतांना ओळखणारे भक्तिहृदय असावे लागते.

चौघेजण राजपुत्र संत-महात्म्यांच्या शोधांत निघाले. दूर-दूरचा प्रवास करून हिमालयांत गेले. हिमाच्छादित पर्वत शिखराच्या पायथ्याशी एक महात्मा राहतात असे त्यांनी ऐकले होते. वाटेंत एक नदी लागली. एक म्हातारा नावाडी नदीत नाव चालवित होता. त्याने त्या चौघा राजपुत्रांना विचारले,

''आपण कोण ? कोठे निघालांत ?''

''आम्ही राजपुत्र आहोत. येथे एक महात्मा आहेत, असे आम्ही ऐकले आहे. त्यांच्याकडून 'शांतिपथ' जाणून घ्यायला आलो आहोत.'' राजपुत्र म्हणाले.

म्हाताऱ्याने मंद स्मित केले. त्यांना नदीपलीकडे सोडून म्हातारा म्हणाला, ''येथे जवळच महात्मा राहतात. त्यांचे दर्शन घ्या!''

संध्याकाळ झाली होती. युवक महात्म्यांच्या जवळ धांवतच गेले. महात्म्यांनी विचारले, ''इतके दूरवर येण्याचे कारण काय?''

''आपण महात्मा ! आपणांकडून 'शांतिपथ' जाणून घ्यायला आलो आहोत'' युवक म्हणाले.

''तुम्हांला शांतिपथ जाणायचे असेल तर त्या म्हाताऱ्या नावाड्याकडे जा!'' महात्म्यांनी आदेश दिला.

युवकांना फारच आश्चर्य वाटले. तपश्चर्या, ध्यान, चिंतन याचे गंधसुद्धा नसलेला तो म्हातारा नाविक. त्याच्याकडून मार्गदर्शन

घ्यायला, त्याला गुरू म्हणून त्याचा स्विकार करायला त्यांचे मन तयार होईना. पण त्या महात्म्यांची अवज्ञा कशी करायची?

नाविक चांदण्याच्या प्रकाशांत नदीच्या ऐल तीरावर शेकोटी पेटवून शेकत गाणे गात बसला होता.

''पुन: कां आलांत ?'' नाविकाने विचारले.

ते युवक म्हणाले, ''आम्हांला क्षमा करा. आम्हाला समजले नाही. आपण कृपा करून आम्हांला दिव्य शांतिपथ दाखवा!''

त्यांची आसक्ति पाहून तो म्हातारा आनंदाने आपले मन उघडे करून म्हणाला,

''जीवनरूपी नदीला दोन तीर ! एक प्रपंच. दुसरे परमार्थ ! आपण जेथे आहोत, तेथे समाधानाने असावे. एकामध्ये राहून दुसऱ्याचे चिंतन केल्यास कोणतेच आपणांस लाभणार नाही. दोहोंचा समतोल राखून जाण्यातच शांति-समाधान !''

नाविकाचे बोलणे ऐकून त्यांना फारच संतोष झाला. चंद्राच्या शीतल किरणांत शांतीचा प्रकाश त्यांना दिसला. संतांचे दर्शन घ्यावे ही अनेक दिवसांपासून त्यांच्या मनांत असलेली आसक्ति फलकारी झाली.

एक भृंग गुंजारव करीत चालला होता. दूरवर कुठल्यातरी पर्वत शिखरावर एक फूल उमलेले होते. त्या भृंगाला वाटेत एक संत भेटला. त्याने त्या भृंगाला विचारले,

''कोठे प्रयाण बरे?''

"एक फूल उमलले आहे. मकरंद भरला आहे. सुगंध सुटला आहे. तेथे.... तेथे !... भृंग म्हणाला. "फूल कोठे आहे ? ते माझ्या डोळ्यांना दिसत नाही. तुझ्या डोळ्यांना सुद्धा दिसत नाही. पण माझ्या हृदयात मात्र एक अज्ञात ओढ आहे. त्या ओढीने मी निघालो आहे. बरे येतो नमस्कार !" असे म्हणत तो भृंग तेथून निघाला.

दूरच्या पर्वतशिखरावर जाऊन पोहोचला. तेथे एक फूल उमलले होते. ते त्या भृंगाचीच वाट पहात होते. फुलाला पाहतांच भृंग साऱ्या जगाला विसरून त्या फुलामध्ये रममाण झाला.

भृंगासारखा कीटक सुद्धा प्राणांहून प्रिय अशा फुलाचा शोध घेतो. माणसा सारखे माणूस असून सुद्धा आपण हृत्पूर्वक आसक्ति ठेवली तर संत समागम झाल्याशिवाय राहील काय ? भक्तीला बलवान बनविणारा सत्संग लाभल्याशिवाय राहील काय ?



# १६
# नित्यानित्य

या जगातं असंख्य वस्तु आहेत. प्रत्येक वस्तूला तीन अवस्था आहेत. सृष्टि-स्थिति-लय. दिसणे-असणे-नसणे. जगाच्या या तीन अवस्था! हे जग मिथ्या! या जगालाच प्रपंच असेही म्हणतात. सृष्टि-स्थिति-लय या तीन अवस्थांच्या पलीकडे जो आहे; तोच परमार्थ होय! तो सत्य आहे!

ही एक फुलवेल. फूल रोज उमलते, कांही काळ असते, नंतर ते कोमेजून जाते.ही फुलवेल अशा शेकडो-हजारो फुलांना जन्म देते. बराच काळ जगते. वेलीच्या दृष्टीने फूल अनित्य! अशा असंख्य वेलींना आश्रय देते भूमि! कितीतरी वेली नष्ट पावल्या तरी भूमि नष्ट होत नाही.आतां या भूमीच्या दृष्टीने पाहिले तर ती वेल सुद्धां अनित्य होय ! तीच वेल फुलाच्या दृष्टीने नित्य ! अशाप्रकारे एकच वस्तु एकाकाळांतच नित्य आणि अनित्यही असेल, तर ते मिथ्या !

एक वस्तु आहे. जगांतील सर्व वस्तूंना ती आधार आहे. ती सृष्टि-स्थिति-लय या तीन्ही अवस्थांच्या पलीकडे आहे. तीच परवस्तु ! तोच परमात्मा ! तो परमात्मा तेवढाच सत्य ! बाकीचे सर्व मिथ्या ! या नित्य सत्य वस्तूंचे प्रेम स्थिर ! तीच भक्ति होय !

आपण जोपर्यंत या जगांत असतो; तो पर्यंत आपण वस्तूंना सोडून राहू शकत नाही. आपण कोणतीही वस्तु घेतली तरी ती मिथ्या आहे; याचे ज्ञान आपणांस असावे. तेव्हां ती वस्तु नष्ट झाली तरी

आपणांस दु:ख होणार नाही. आपली मन:शांति ढळत नाही.

असा हा नित्यानित्य विवेक ज्यांना आहे; तेच संत! अनित्य अशा धन-संपदा, कनक-कामिनी, मान-मर्यादा यांच्या मागे ते जात नाहीत.

एक संत होता. त्या देशातील सर्व जनतेमध्ये त्या संताविषयी अपार गौरव होता. त्या देशाचा राजा सुद्धा त्या संताला फारच मान देत असे. त्याला गुरूस्थानी मानीत असे. त्यामुळे त्या संताची प्रतिष्ठा खूपच वाढली. असे असूनही संताने देश सोडून जाण्याचा निर्णय घेतला. महाराजांना ही बातमी समजली.

महाराजाने संतापाशी येऊन भक्ति पूर्वक साष्टांग प्रणिपात करून विनयपूर्वक विचारले, ''गुरू महाराज! आपण हा देश सोडून निघालांत; असे मी ऐकतो. ते खरे आहे काय?''

''होय! खरे आहे!'' संत म्हणाले.

''कां बरे? माझ्याकडून अथवा माझ्या प्रजाजनांकडून कांही प्रमाद घडला कां? कोणी तुम्हाला त्रास देतो आहे कां? मी तुमच्या सर्व आपदांचे निवारण करेन!'' राजा म्हणाला.

''मला येथे कसलातरी त्रास आहे; म्हणून मी हा देश सोडून चाललो; असा त्याचा अर्थ नव्हे. एक दिवस सर्व कांही नाश पावणारच आहे ना ? या राज्यांत कोणीही शाश्वतपणे राहू शकणार नाहीत. कोणाची इच्छा असो वा नसो ! मी हा देश एक दिवस सोडून गेलेच पाहिजे आणि तूं सुद्धां !

असे म्हणून संत तो देश सोडून चालता झाला.

या प्रसंगाने राजाच्या मनांत नित्य-अनित्य विवेकरूपी ज्योत प्रज्वलित झाली !

वस्तूचे स्वरूप ज्ञान ज्याला झाले आहे; असा नित्यानित्य विवेकी अनित्य अथवा मिथ्या वस्तूंच्या मागे कधीही धावत नाही. अज्ञानी माणूस या प्रापंचिक वस्तु नित्य आहेत; असे समजतो. या प्रपंचात कोणती वस्तु नित्य आहे? कोणती वस्तु नित्य-नूतन आहे ?

सदा कोणत्यातरी नूतन वस्तूची इच्छा होणे हा मनुष्य स्वभाव होय! घर-दार, कपडालत्ता, दागदागिने सर्व कांही नवीन असावे; असे त्याला वाटते. पण सृष्टि-स्थिति-लय या अवस्था त्रयांना बाध्य असा हा प्रपंच मिथ्या आहे. समस्त प्रपंचच मिथ्या असल्याने प्रापंचिक वस्तु नित्य-नूतन असणे शक्य नाही हे माणूस विसरतो. आपण ज्या वस्तूवर प्रेम करतो, ती वस्तु जुनी झाली अथवा नष्ट झाली तर तो दुःखी होतो.

एका श्रीमंताने एक मोठे घर बांधले. त्या घरावर यजमानाचे फारच प्रेम! त्या घराशेजारीच दुसऱ्याने या श्रीमंत माणसाहून मोठे आणि उंच घर बांधले. आपण सुद्धा तसलेच मोठे घर बांधावे असे त्याला वाटले. तो आपले जुने घर पाडायला निघाला.

जुने घर सांगू लागले, ''ज्यावेळी तूं नवीन बांधलेस तेव्हां तूं माझ्यावर किती प्रेम करीत होतास ! माझ्यासाठी तूं जुनी झोपडी पाडून टाकलीस. तेव्हां ती झोपडी तुला जुनी-पुराणी वाटली तसेच मी तुला आज जुने-पुराणे वाटत आहे. उद्या तूं जे नवे घर बांधशील, ते सुद्धां एक दिवस जुने पुराणे होईल. नीट विचार कर! मला पाडूं नकोस !

घराचा हितोपदेश ऐकण्याच्या मन:स्थितीत तो यजमान नव्हता.

नवीन घर बांधण्याचे मनसुबे बांधत जुने घर पाडतां पाडतां तो म्हातारा झाला. नवीन घर बांधणे त्याला शक्य झाले नाही. त्या जुन्या घराचा नित्यानित्य विवेक न ऐकल्याने तो दु:खांत पडला.

सत्य वस्तु नित्य-नूतन, शाश्वत! ती वस्तु कधीही आपणांस दगा देणार नाही. जुनी होत नाही. नष्ट होत नाही. अशा नित्य-सत्य वस्तूचे प्रेमसुद्धां नित्य, शाश्वत. त्यामुळे स्थिर सुख शांति! अलौकिक अशा या सत्य वस्तूवरील प्रेमच परम-प्रेम होय! तीच भक्ति! ही भक्ति वाढीला लागल्यास नित्यानित्य विवेकच ज्यांचा प्राण-अशा संतांचा संग आवश्यक! तसा सत्संग लभला नाही, तर काय करावे?

जेव्हां संतांचा-शरणांचा सत्संग लाभतो; तेव्हां सर्व कांही सोडून देऊन त्या शरणांच्या-संतांच्या सत्संगातच रहावे. जेव्हा संतांचे सानिध्य लाभत नाही; तेव्हां त्यांच्या आठवणींचा संग, त्यांच्या वाणीचा संग, त्यांच्या उपदेशाचा संग केला तरी पुरे! आपण धन्य होतो. आपली भक्ति नवचैतन्य मिळविते.

येशू, महावीर, बुद्ध, बसव इत्यादि महापुरुष दैहिक रूपाने आज नाहीत. त्यांचा प्रत्यक्ष सत्संग आतां आपणांस साध्य नाही. पण त्यांच्या आत्मानुभवाच्या उपदेशाचा-त्यांच्या अमृत वाणीचा संग आपण आज सुद्धां करूं शकतो. थोर महात्म्यांच्या उपदेशाचा संग झाला तर त्या महात्म्यांचा प्रत्यक्ष संग घडल्यासारखेच होय! संतवाणीत त्या महात्म्यांच्या आत्म्याचे तेज भरलेले असते. त्यामुळे संत-वाणी म्हणजे केवळ वाणी नव्हे ! तो मंत्र ! ज्योतिर्लिंग !! वाग्‌लिंग !! त्या वाग्‌लिंगाच्या संगाने आपल्या ठिकाणी विवेकाची ज्योति प्रज्वलित होते. त्यामुळे आपले जीवन निर्मळ होते. भक्ति फोफावते!

''आशा हीच दु:खाचे मूळ होय!'' असे बुद्धाने सांगितले. ही परमानुभवाची वाग्ज्योति! या वाग्ज्योतीच्या शांत-शीतल प्रकाशांत आपण त्या उपदेशाचे मनन करून आनंद मिळवावा. हाच संत-वाणी-संग होय! हाच वाग्-लिंग संग! त्यामुळे होतो भव-भंग ! तेव्हा मानवाच्या मनांतील दु:ख-रूपी अंधार नाहीसा होतो. आत्मानंदाची ज्योति प्रकाशमान होते! हीच जीवनमुक्ती होय ! हीच भक्तीची फलश्रुति होय !

वाटेत एक पैशाची थैली पडली आहे. तिला पाहतांच कोणाचेही मन तिकडे ओढ घेते. ती थैली उचलून घ्यावीशी वाटते. तेव्हां बुद्धाचा उपदेश आठवावा. ''आशा हीच दु:खाचे मूळ आहे; हे ओळखावे. तेव्हां आपले मन माघार घेते. ती पैशाची थैली आपण उचलून घेत नाही. ती उचलून घेतली असती ; तर जे दु:ख झाले असते, ते चुकते. संतांचे एक वचन सुद्धा आपले रक्षण करते. महात्मा बसवेश्वर म्हणतात -

एले एले मानवा, अळियासे बेडवो,
काळ बेळदिंगळु सिरि स्थिरवल्ल!
केडिल्लद पदवियन्नीव
कूडलसंगम देवन मरेयदे पूजिसु.

(अरे मानवा ! क्षणभंगुर वस्तूंची आशा करू नकोस! कृष्ण पक्षाचे चांदणे स्थिर नव्हे, तशी श्रीमंती सुद्धा स्थिर नव्हे. अविनाशी अशा त्या कूडलसंगम देवाची न विसरतां पूजा कर.)

कृष्ण पक्षाचे चांदणे जसे दिवसे दिवस क्षीण होत जाते तशीच आपली श्री-संपत्ति सुद्धा दिने-दिने क्षीण होत जाते. त्याची आशा धरू नकोस!

महावीर म्हणतो --

''वीतरागी भव !''

राग म्हणजे अतिशय प्रेम ! व्यामोह ! कोणत्याही प्रापंचिक वस्तूला आपण अति प्रेमाने धरूं नये. हाच त्याचा अर्थ !

व्यापारी दुकानांत तराजूने तोलत साऱ्या जगालाच विसरतो. आपले संपूर्ण आयुष्य तो तोलण्यातच घालवितो. त्याचे पैसा मिळविण्याचे कधीच थांबत नाही. त्याला परम सत्याचे भान कधीच येत नाही! शांति-समाधान कसे लाभेल?

आपण या प्रपंचात राहून सत्कर्मे आचरावीत. कर्म करून ही न केल्याप्रमाणे असावे. हाच 'वीतराग!' यामुळे आपणांस शांति-सुख, समाधान. संतांच्या नित्यानित्य विवेकाच्या अशा एका वाक्याने आपल्या हृदयांत भक्तीचा वृक्ष जोमाने फोफावतो.



# १७.
# विराग

संताचे हृदय फुलाहून कोमल ! निर्मळ ! प्रेमाने भरलेले ! संत सत्य-प्रिय ! फूल जसे देवाला प्रिय असते;तसे संत सुध्दा देवाला प्रिय असतात! माणिक-मोत्याप्रमाणे फूल मौल्यवान नसते. पण फुलामध्ये दिव्य सौंदर्य असते! तेच सत्यं-शिवं-सुंदरम् होय ! संतापाशी भौतिक संपत्ति असेल अथवा नसेल पण त्यांच्यापाशी आध्यात्मिक संपत्तीला कांहीच तोटा नाही. ही संपत्ती कसली ? त्यांच्या हृदय कमळीं परमप्रेम रूपी सद्‌भक्तीचा मकरंद; सुज्ञानाचे सौंदर्य; स्वानुभवाचा सुगंध भरलेला आहे. त्यामुळे त्यांच्या हृदयीं रागद्वेषादींना मुळीच थारा नाही.

आपण संसारी तसे नव्हे. आपल्या जीवनांत रागद्वेषाचे जाळे पसरले आहे. जीवनाच्या अंती - मरणसमयीसुध्दां राग-द्वेष सुटत नाही. एका माणसाने मृत्युसमयी आपल्या मुलाला जवळ बोलावून सांगितले, '' मरणानंतर माझ्या आत्म्याला शांति लाभायची असेल तर मला एक वचन दे! मी सांगेन ते कार्य करेन म्हणून!''

आपल्या पित्याची अंतिम इच्छा थोर असावी असा विचार करून मुलाने पित्याला वचन दिले.

'' बाबा, तुमची काय इच्छा असेल ती सांगा. काय वाटेल ते झाले तरी, मी तुमची इच्छा पुरी करायला सिध्द आहे.''

'' हे पहा, आपल्या घराशेजारी असलेले शेजाऱ्याचे घर,तेथे असूं नये, असे कर ! '',असे म्हणून म्हाताऱ्याने डोळे मिटले.

मरतानासुध्दा बाप मुलाच्या मनांत विषाचे बिज पेरून मेला ! अशा माणसाच्या मनात प्रेम कसे उद्‌भवेल? भक्तिभाव कसा रूजेल? मुक्ति कशी लाभेल?

साधु-संतांच्या मनांत कोणाविषयी सुध्दां द्वेषभाव नसतो. सर्वांविषयी प्रेम ! देवावर भक्ति ! प्रापंचिक विषयांत वैराग्य! ते निरासक्त होत ! संत या जगांत परम सत्य,परमात्मा यांहून वेगळ्या अशा अन्य कुठल्याही वस्तूची अपेक्षा करीत नाहीत.त्यांना सत्य वस्तुविषयी गाढ प्रेम ! सद्‌भक्ति !

छत्रपती शिवाजी महाराजांनी गो-ब्राम्हण प्रतिपालनासाठीच हिंदवी स्वराज्याची स्थापना केली. गुरू रामदास स्वामी तितकेच समर्थ! वैराग्य इतक्या पराकोटीला पोहोचले होते की अंगावरच्या लंगोटी आणि भिक्षापात्राशिवाय त्यांनी अन्य कसल्या ही संपत्तीचा संग्रह करण्याची आशा बाळगली नव्हती!

''जय! जय ! रघुवीर समर्थ !'' असा मंत्र घोष करीत रामदास स्वामी छत्रपती शिवाजी महाराजांच्या राजवाड्यापुढे उभे राहिले.

साक्षात् सद्‌गुरू आपल्या दारी उभे राहिले, हे पाहून शिवाजी महाराजांना आनंदाचे भरते आले. गुरूचरणी लोटांगण घातले. गुरूसेवेची सुवर्णसंधी सोडूं नये, असे त्यांना वाटले.

एका कागदावर संपूर्ण स्वराज्याचे दानपत्र लिहून ते दानपत्र रामदास स्वामींच्या झोळीत घातले.

'' शिवबा! काय हे?'' सद्‌गुरूनी विचारले.

'' गुरूमाउली, साधुसंतांच्या - धर्माच्या रक्षणासाठीच मी हे

राज्य मिळविले. ज्यांच्यासाठी हे मिळविले; त्यांच्याच चरणीं मी वाहतो आहे !'' शिवाजी महाराज म्हणाले.

'' माझ्या हातीं तुझे राज्य आणि तलवार सोपवून तूं काय करणार आहेस शिवबा ?'' संत रामदासांनी विचारले.

'' मी आपला सेवक !'' शिवाजी महाराज म्हणाले, '' स्वामींची जशी आज्ञा होईल तसे त्या आज्ञेचे पालन मी करेन!''

गुरू रामदासांच्या मुखावर प्रसन्नतेचे स्मित हास्य फुलले.

'' ठीक आहे ! माझी आज्ञा अशी आहे कीं, भगवंताला अर्पण केलेले हे राज्य ! या भावनेनेच तूं या राज्याचा प्रतिपाळ कर ! '' संत रामदासांनी ते पत्र शिवाजी महाराजांना परत केले. धन्य ते वैराग्यसंपन्न साधु !

संताची अमृतवाणी आपण नित्य भक्तिभावाने श्रवण करावी. त्यांच्या उपदेशामृताने भरलेल्या ग्रंथांचे पठण करावे. संतवाणीमध्ये त्यांचा अनुभव भरलेला असतो. परमात्म्याची अनुभूति त्यांच्या वाणींत साठविलेली असते. त्यांनी अनुभवलेला सत्याचा प्रकाश त्यांच्या उपदेशांतून प्रस्फुटित होतो. त्यांच्या हृदयांतील भगवत्प्रेम, माधुर्य त्यांच्या वाणीतून ओसंडून वाहात असते. ही संतवाणी श्रवण केली असतां साधकाच्या मनांतील अज्ञानाचा अंधार नाहीसा होतो. भगवंताचा दिव्य प्रकाश त्याच्या अंतरंगाला उजळून टाकतो.

पाताळदग्घवणिय नेणिह्लदे तेगेयबहुदे
सोपानव बलदिंदह्लदे ?

शब्द सोपानव कट्टि नडेसिदरु पुरातनरु,
देवलोकक्के बट्टे काणिरो.
मर्त्यर मनद मैलिगेय कळेयलेंदु
गीत मातेंब ज्योतिय बेळगिकोट्टरु,
कूडल चन्नसंगनशरणरू

– चन्नबसवेश्वर.

पाताळांतील पाणी दोरीच्या सहायाशिवाय अथवा सोपानांशिवाय वर आणणे शक्य आहे कां ? संतांनी शब्दांचा सोपान बांधून ते काम केले. देवलोकाचा मार्ग तो! मर्त्य मानवांच्या मनांतील मळ नाहीसा करण्यास गीत(वचन)वाणीची ज्योति पाजळून दिली शरणांनी.

चन्नबसवेश्वरांनी महात्म्यांच्या – साधु – संतांच्या वाणीची महिमा सुंदर रीतीने चित्रित कैली आहे. संत-वाणी म्हणजे देवलोकाचा मार्ग दाखविणारा दिवा! आपल्या मनांतील मळ धुवून टाकणारी पावनगंगा!

एका बाजूला मिथ्या जगत् – भूमंडल! दुसऱ्या बाजूला सत्य असे ब्रह्म मंडल. त्या दोन्हींना एकत्र जोडणारा सोपान म्हणजे संत-वाणी. त्यांच्या अमर वाणीच्या स्मरणाचा संग हीच भक्तीची शक्ति! हेच मुक्तीचे मूळ होय!

संतांचा उपदेश – त्यांची वचने आपणांस खूप-खूप माहित आहेत. असे असूनही माहित नसल्याप्रमाणे आपण वागतो आहोत. त्यामुळे आपणांस भक्ति आणि मुक्ति दायक वैराग्यपूर्ण जीवन जगतां येत नाही. भगवद्गीतेतील त्या सातशेहे श्लोकांचे स्मरण, उपदेश करणाऱ्या भगवान श्रीकृष्णाला आणि ऐकणाऱ्या अर्जुनाला सुध्दा असेल

कीं नाही ? याची शंकाच वाटते. आम्हांला मात्र भगवद्गीता अगदी तोंडपाठ ! पण काय लाभ? आपण तो उपदेश आचरणांत आणण्याचा प्रयत्न कितपत करतो आहोत?

'आशा हीच दुःखाचे कारण !' हा गौतम बुध्दाचा उपदेश कोणाला माहित नाही? तरी पण क्षुद्र आशा आम्हांला सोडवत नाही. आपण नित्य अनेक ग्रंथांची पारायणे करतो आहोत. त्यांचा परिणाम आपणांवर कितपत झाला आहे? सत्य-प्रेम, वैराग्य कितपत आपल्या आचरणांत आहे?

धर्माचे ज्ञान नसलेले लोक तेवढेच क्षुद्र आशेला बळी पडले आहेत; असे नव्हे. आपण धर्मग्रंथाचा खूप अभ्यास करतो. त्यांच्या सहायाने केवढी उंची गाठतो. पण पुनः सरळ आशेच्या खोल दरीत उडी मारतो.

आपल्या साधनासौधावर सुवर्णाक्षरांनी 'सत्यमेव जयते' ही अक्षरे कोरतो. पण आपणांला कितीतरी वेळा 'सत्यमेव जयते' या घोषवाक्याचा विसर पडत नाही काय? या विस्मरणाच्या तडाख्यांतून कोण सुटला आहे ?

एका मंदिरात एक अर्चक राहात होता. मोठा विद्वान ! प्रामाणिक, मध्यम वयाचा. घरी बायको मुले. मंदिरात मिळणाऱ्या दान दक्षिणेवर तो मोठ्या समाधानाने - संतोषाने जीवन कंठीत होता.

देवाची सेवा तो फारच भक्तिभावाने - निष्ठेने करीत असे! वेळेवर अष्टविधार्चन - षोडशोपचार पूजा करीत असे. त्या मंदिराचे सारे वातावरण भक्तिभावनेने ओसंडून वाहात होते. त्या पुजाऱ्याला राजाश्रय

लाभला होता. तरी पण त्याच्या हृदयांत आशा भरलेली नव्हती साध्या जीवनातच तो संतुष्ट होता.

एकदां त्या अर्चकाच्या बायकोची बहीण आपल्या बहिणीला भेटायला आली. तिचा पति मोठा श्रीमंत! फार दिवसानंतर बहिणी-बहिणींची भेट. बहिणीच्या अंगावर भरपूर सोन्या-मोत्यांचे दागिने.

अर्चक घरी आला. बहिणी-बहिणी अत्यंत आत्मीयतेने बोलत बसल्या होत्या. पत्नीची बहिण फारच प्रसन्नचित्त होऊन हंसत खेळत मोठ्या उत्साहाने बोलत होती. अर्चकाच्या पत्नीचे मुख म्लान झाले होते. '' कधीही नसलेले दुःख आजच तिच्या मुखावर कां बरे दिसते आहे ? '' अर्चक विचार करूं लागला.

आपल्या बहीणीचे वैभव व आपल्या पतीचे दारिद्रय यांची तुलना केल्याचे दुःख पत्नीच्या मुखावर प्रकटले होते. अर्चकाने तिच्या दुःखाचे कारण ओळखले.

त्या दिवशी रात्री अर्चकाला झोप लागेना. '' तीस वर्षे संसार करूनही आपली पत्नी लंकेची पार्वतीच राहिली. एक चांगलासा दागिना करवून देण्याचे आपल्या हातून घडले नाही. गरीब परिस्थितीत ते कसे बरे शक्य होईल? आपल्या पत्नीचे दुःख दूर करायचे तरी कसे ?'' अर्चक विचार करीत राहिला.

त्याला एक उपाय सुचला. मध्यरात्री तो देवळाकडे निघाला. देवळांतल्या राधा-कृष्णाच्या मूर्तीला भक्तांनी खूप दागदागिने दिले होते. त्या अर्चकाने या पूर्वी कधीही त्या दागदागिन्यांकडे आशाळभूत नजरेने पाहिले नव्हते. आज मात्र त्याच्याने राहवले नाही!

तो देवळांत गेला. आंत जाऊन त्याने दार बंद केले. राधा-कृष्णांच्या मूर्ति समईच्या मंद प्रकाशात स्मित हास्य करीत होत्या. दागिने चमचम चमकू लागले. क्षणभर थांबून अर्चकाने सभोवती पाहिले. गेल्या तीस वर्षांत त्याने त्या पवित्र मूर्तींची अत्यंत निष्ठेने पूजा केली होती.

त्या मूर्तींच्या पवित्र सेवेत आपल्या बायको-मुलांचाही त्याला विसर पडला होता! भगवदानंदाचा अनुभव त्याला लाभला होता.

आज अर्चकाला त्या पवित्र देवता मूर्ति दिसल्या नाहीत. त्याच्या डोळ्यापुढे आपल्या बायकोचे हिरमुसलेले तोंड व आपल्या मेहुणींच्या अंगावरील दाग-दागिने तेवढेच दिसत होते. भगवद्गीता-वेद-उपनिषद सकल शास्त्र पुराणांचा त्याला विसर पडला. अर्चकाची बुद्धि पूर्णपणे भ्रष्ट झाली. राधेच्या मूर्तीवरील एक नवरत्न हार उचलून घेऊन तो विचार करूं लागला, ''आपल्या पत्नीच्या गळ्यांत हा हार किती शोभून दिसेल; नाही कां?''

आपण संत-वाणी केवळ ऐकून अथवा पठण करून विराग-विरति लाभणार नाही. संत-महंतांचा पावन संग-सत्संग घडला पाहिजे. सत्संगाने आपल्या साधनेला वज्र कवच लाभते. त्यामुळे वैराग्य स्थिर होते. भक्ति-भवनाचा तोच मजबूत पाया होय !



# १८.
# सत्कार्य

संतानी आपली आंतरिक अनुभूति आपल्या अमृत वाणींत प्रकट केली. त्यांच्या शिष्यांनी आपल्या गुरूची अनुभाव वाणी देशोदेशी श्रद्धेने पसरविली. बुद्धाने आपल्या जीवनांतील ऐंशी वर्षांचा काल निर्वाणाच्या उपदेशांतच घालविला. त्याच्या शिष्यांनी बुद्धाचा शांतिसंदेश हिमालया पलीकडे तिबेट-चीन देशांत आणि सागरापलिकडे श्रीलंका, ब्रम्हदेश, सयाम, इंडोचीन, कंबोडीया, जपान आदि देशांतून पसरविला.

चीन देशातून हू-एन-त्संग या देशांत आला होता. त्याकाळी आजच्यासारखी वाहतुकीची साधने नव्हती. पायी चालतच यावे लागे. जंगलांतून हिंस्र पशू आणि वाटमाऱ्यांचे संकट होतेच. त्या सर्व संकटांचा सामना करीत हू-एन-त्संग भारतात आला. येथून अध्यात्मिक संपत्ती, संत-वाणी त्याने आपल्या देशांत नेली.

महात्म्यांच्या वाणीसाठी-उपदेशासाठी त्यांनी इतके कष्ट कां बरे घेतले? मानव-जीवनाच्या सुखाचे सूत्र संत-वाणीत आहे. शांति-समाधानाचे 'साधना पथ' त्यांत आहे. मानवाचे अंतिम ध्येय म्हणजे आत्मानंद मिळविणे-आत्मसाक्षात्कार करून घेणे. त्यासाठी आवश्यक अशा सर्व गोष्टी संतांनी आपल्या अमरवाणीत भरलेल्या आहेत.

आज आपण बुद्ध-बसव-महावीर यांचे दर्शन घेऊं शकत नाही. पण त्यांच्या अनुभवांचे बोल आपण आजसुद्धा ग्रंथामध्ये वाचूं शकतो, ऐकूं शकतो. आपण जे वाचतो आणि ऐकतो ते नित्य स्मरणांत ठेवावे.

तीच श्रवण भक्ति होय. ती सत्संगाइतकीच प्रभावशाली आहे.

संताची अमृतवाणी आपण केवळ तोंडपाठ करून, पोपटपंची करून ती अमृतवाणी आपले रक्षण करेल असे समजणे, हा शुद्ध भाबडेपणा आहे. ती अमृतवाणी आपण नित्य स्मरण केली पाहिजे, मनन केली पाहिजे. आत्मसात केली पाहिजे. त्यांच्या उपदेशाप्रमाणे आपण वागले पाहिजे. तरच संत-वाणी आपले रक्षण करूं शकेल.

महात्म्यांच्या शब्दांमध्ये सामर्थ्य नाही असे नाही. त्या सामर्थ्याचा उपयोग आपण करून घेतला नाही. डॉक्टरांनी दिलेल्या औषधाच्या गोळ्या खिशांत ठेवून घेतल्याने रोग दूर होईल काय? शक्ति-सामर्थ्य लाभेल काय? डॉक्टरांनी सागितल्याप्रमाणे आहार-विहार पालन करून नियमितपणे गोळ्या घेतल्या तरच ना रोग दूर होणार?

खडी साखरेचा खडा तोंडात ठेवून तो विरघळत गेला तरच त्याची गोडी कळेल. एकदम खडीसाखर गिळून टाकली तर त्याची गोडी आपणांस कळणे शक्य आहे काय? संतांची अमृत-मधुरवाणी आपण सावध चित्ताने सावकाशपणे ग्रहण केली पाहिजे. सतत त्या वाणीचे चिंतन-मनन-ध्यान केले पाहिजे. तरच आपणांस आत्मानंदाचा दिव्य प्रकाश लाभूं शकेल! सत्याचा मार्ग सापडेल! भक्तीला बळ येईल.

एक भव्य घर बांधून त्या घरांत दिवा लावून ठेवला तेवढ्याने संपत नाही. घराला घरपण यायचे असेल तर त्या दिव्याच्या प्रकाशांत सत्कार्ये झाली पाहिजेत. अतिथि सत्कार घडला पाहिजे. बंधुबांधवांचा आदर सत्कार-जेवण खाण चालले पाहिजे. गुरूदेवांचे, साधु-संतांचे आगमन झाले पाहिजे. दान-धर्मादि सत्कार्ये घडली पाहिजे. तरच त्या

घराची शोभा वाढेल!

त्याचप्रमाणे या देहरूपी घरामध्ये सद्‌गुरूची प्रज्वलित केलेली ज्ञान ज्योति नित्य प्रकाशमान असावी. त्या दैवी प्रकाशांत सत्कार्य साधना नित्य घडावी. तरच संत-वाणी फलद्रूपी होईल. आपल्या भक्तीला दिव्य शक्ति लाभेल!

संत एकनाथ महाराज म्हणतात, ''भक्ताने नित्य सत्कर्म केलेच पाहिजे!'' त्यांच्या जीवनात घडलेली घटना अशी -

एकदा संत एकनाथ महाराज आपल्या खांद्यावर काशीहून पवित्र गंगाजलाची कावडी वाहून रामेश्वराच्या तीर्थयात्रेला निघाले होते. काशी विश्वनाथाचे दर्शन घेऊन गंगा नदीच्या पवित्र जलाचा रामेश्वराच्या मस्तकी अभिषेक करण्याचा पुण्य संकल्प अनेक साधक करतात. त्या काळी वाहतुकीची साधने फारच कमी असल्याने पायी प्रवास करावा लागे!

उन्हाळ्याचे दिवस.... दुपारची वेळ. सर्व यात्रेकरू कोठेतरी झाडाची थंडगार सावली दिसली तर दुपार टळेपर्यंत विश्रांती घेऊन पुढे जावे, असा विचार करीत होते. पण कडक उन्हामुळे झाडे झुडपे सुद्धा होरपळल्याप्रमाणे झाली होती.

संत एकनाथांचे लक्ष तहानेने व्याकूळ होऊन तडफडत पडलेल्या गाढवाकडे गेले. त्याला पाहून एकनाथांचे हृदय कळवळले. कसलाही मागचा पुढचा विचार न करता त्यांनी खांद्यावरील पवित्र गंगाजलाची कावड खाली उतरविली; आणि त्या गाढवाला पवित्र गंगाजल पाजले. पाणी पिऊन गाढवाला तरतरी आली. ते उठून चालायला लागले.

काशीहून पवित्र गंगाजलाची कावड वाहात पायी चालत एकनाथ महाराजांना किती कष्ट झाले होते! ते पवित्र गंगाजल रामेश्वराच्या मस्तकी अभिषेक करण्यासाठीच तर येवढे कष्ट त्यांनी झेलले होते.

पण संत एकनाथांना त्या गाढवाच्या तहानलेल्या डोळ्यांत रामेश्वराचे दर्शन घडले होते. दीन दुबळ्यांच्या, प्राणी मात्रांच्या सेवेतच ईश्वराच्या सेवेचे पुण्य त्यांना घडले होते. अशा सत्कार्यामध्येच भगवंताचे दर्शन घडते. संतांचा उपदेश आचरणांत यायचा असेल तर सत्कार्ये घडली पाहिजेत.

युरोपात एक संत जीवनभर मानवसेवा करून मृत्युशय्येवर पडला होता. त्याच्या शिष्यांनी त्या संताला विचारले,

''महाराज, आपण आयुष्यभर मानवांची सेवा करीतच आलांत. आतां आपण परमेश्वराच्या राज्यांत प्रवेश करणार आहांत. आपला अंतिम संदेश देण्याची कृपा करावी.''

संत म्हणाला, ''मृत्यूनंतर स्मशानभूमीत आपण सर्वजण समान असतो. हीच समानता भावैक्यता मरणापूर्वी म्हणजे जिवंत असतानासुद्धा मानवाच्या जीवनांत यावी. हीच जीवनसिध्दि होय!''

जीवनाच्या सफलतेचे रहस्य कशांत आहे ? भावैक्याहून सफल साधना या जीवनात अन्य कोणतीही नाही. महात्म्यांच्या अशा एकेक वाक्यांत साधकाला मोक्षाचा मार्ग सांपडतो.



# १९.
# प्रकाशमान जीवन

न तत्र सूर्योभाति, न चंद्र तारकं
ने मा विद्युतो भांति-कुतो  यमग्नि : ।
तमेव भांतमनुभाति सर्वं
तस्य भाषा सर्वमिदं विभाति ॥ मुंडक १०

तेथे सूर्य प्रकाशत नाही. चंद्र - तारका प्रकाशत नाहीत. विजेचा प्रकाशसुध्दा तेथे नाही. तर मग या अग्नीची काय कथा ? तो प्रकाशतो. त्याचा प्रकाश ग्रहण करून सर्व वस्तु प्रकाशतात.

अशाप्रकारे सूर्य-चंद्र, विद्युत-तारा, अग्नि यांना प्रकाश देणारा परम प्रकाश तो कोणता?

हा बाह्य प्रपंच अथवा बाह्य जगत गिरी गव्हर दऱ्याखोरी, नदीनाले, झाडे-झुडुपे,पशु-पक्षी यांनी भरलेला, अत्यंत विशाल! यांना पाहण्यास सूर्य-चंद्रादींचा भौतिक प्रकाश अत्यंत आवश्यक! हा प्रकाश नसेल तर डोळे असूनसुध्दा आपण आंधळेच!

आपल्या मनांत - आपल्या अंतरंगांत या बाह्य प्रपंचाहून भव्य असा प्रपंच आहे. बाह्य प्रपंचाच्या वस्तूंना एक मोजमाप, एक संख्या सीमा असते. पण आपल्या अंतरंगांत असणाऱ्या विषयांना, विचारांना, कल्पनांना, भावनांना संख्या नसते - सीमा नसते. राग-द्वेष, सुख-

दुःख, मोह-मद, आशा-आमिष एक कीं दोन ? अनंत विषय आपल्या अंतरंगी भरलेले असतात. त्यांना आपण कोणत्या प्रकाशांत पाहतो बरे?

मातेचे मूल, किती तरी दिवसांपूर्वी ते देवाघरी गेलेले असते. पण त्या मुलाची माता अजून त्या मुलाची आठवण काढते. त्या मुलाला आपल्या अंतरंगी स्पष्टपणे पाहते. डोळ्यांसमोरील जग सगळे नाहीसे करून त्या बाळाला दाखविणारा तो दिव्य प्रकाश कोणता ? तो कोठे आहे ? त्याचे स्वरूप कसे आहे ?

क्षणभर डोळे मिटून ध्यानस्थ व्हा. तेव्हां बाहेरचे घर - आंतले घर बनते. बाहेर असलेले समस्त जीव - समस्त प्रपंच सगळे जग आपले आंतले प्रपंच बनते. हा आपला आंतरिक प्रपंच बाह्यप्रपंचापेक्षा कितीतरी पटीने सुंदर-सुखमय भासतो. कोणत्या प्रकाशांत हा भास आपणास होतो ? या दिव्य प्रकाशांत आपल्या अंतरंगी एका विशाल अशा जगाचाच अनुभव येतो. तो दिव्य प्रकाश कोणता ? त्याला कसे ओळखायचे ? त्याला ओळखायचा मार्ग कोणता ?

तेला-तुपात वात पेटवून प्रज्वलित केलेल्या, डोळे असतील तरच दिसणाऱ्या बहिरंगाच्या प्रकाश मूळाला निश्चित केंद्र आहे, आकार आहे. कोटि-कोटि वर्षांपासून प्रकाश देणारे सूर्य आणि तारेसुध्दा या नियमाला अपवाद नव्हेत.

कोणत्याही उपाधीशिवाय निरंतर प्रकाशमान अशा अंतरंगाच्या ज्ञान ज्योतीला कसलेही बंधन नाही. ती निराकार - निर्मळ - अखंड, अद्वय ! ही ज्योति म्हणजेच परंज्योति, परमात्मा !! सूर्य-चंद्र नक्षत्रादि

त्या परंज्योति, परमात्म्याच्या प्रकाशांतच झगमगतात.

अंतरंगाच्या या महाज्योतीमुळे आपल्या डोळ्यांत शक्ति, भावनेत बल, बुध्दीमध्ये तेज आणि आत्म्यामध्ये ज्ञान ! अधिक काय सांगावे ? व्यष्टि-समष्टि यांनी बनलेले समस्त प्रपंच - जगत् त्या करूणाळु दिव्य प्रकाशाच्या बलानेच अस्तित्वांत आहे.

चराचर प्रपंचाच्या प्राणांना प्राण होऊन असणाऱ्या त्या महाप्रकाशाचे ज्ञान ज्याला आहे, तोच गुरू. महाप्रकाशच देव असल्याने गुरू वेगळा नव्हे आणि देव ही वेगळा नव्हे.गुरूचे अदृश्य रूपच देव होय ! देवाचे दृश्य रूपच गुरू ! त्या परंज्योति परमात्म्याचे ज्ञानच आपल्या सर्वांगांच्या आंत-बाहेर भरून घेऊन ज्ञानमूर्ति झालेला गुरू साक्षात परब्रह्म नव्हे तर काय ?

देवाचे स्वरूपच अशा त्या गुरूची वाणी म्हणजे देव-वाणी होय ! ती दिव्यवाणी ! प्रकाशमान अशी भव्य वाणी ! गुरुदेवांची ती प्रकाशमान दिव्य वाणी सत्कर्मासमवेत आपण आचरणांत आणली तर आपल्या भक्तीला अदम्य शक्ति लाभते. कसलीही संकटे आली तरी त्यांना तोंड देत भक्ताची साधना निरंतर प्रगति करूं लागते. सिध्दीचा श्रीगिरी गाठतां येतो. साधकाला ज्ञानाचे अमृतफळ - जीवन्मुक्ति लाभते. तेच प्रकाशमान जीवन होय !

आपणांपाशी नित्य महात्म्यांची अमृतवाणी असावी. त्या अमृत वाणीला योग्य असे जीवन आपण कंठावे. जिवंत असेपर्यंत भक्ताने सन्मार्गांतच असावे. सत्कार्यें करावीत. त्यामुळे त्याच्या ज्ञानाला बळ लाभते. भक्तीला संरक्षण लाभते.

सत्कार्ये म्हणजे कोणती ? सन्मार्ग म्हणजे काय ? जी कार्ये केल्याने महात्म्यांनी दिलेल्या ज्ञानाचा दिवा मालवत नाही; भक्ति रूपी फूल कोमेजत नाही; ती सत्कार्ये-सन्मार्ग तो ! तसे पाहिले तर सत्य-शुद्ध भावनेने केलेले कर्म सुकर्मच ! शिव-कार्यच ! सत्य दर्शन करून देणारा मार्गच सन्मार्ग होय !

जपान देशांत एक श्रेष्ठ असा बौद्ध गुरू होता. विशाल असा बौद्ध - विहार, सभोवती निर्सगाचे सुंदर रमणीय दृश्य ! त्याच्या मध्यभागी गुरूचा आनंदवास !

देशाच्या कानाकोपऱ्यांतून लोक गुरू दर्शनाला येत. एके दिवशी एक युवक आला. डोक्यावरील केस विस्कटलेले, कृश देह, मलिन वस्त्रे, डोळ्यांत तेज ! अंतरंगांत निर्वाणाची अदम्य इच्छा !

गुरूना वंदन करून युवक म्हणाला, '' महाराज ! मला निर्वाण हवे ! बुद्धत्व हवे ! कृपाकरून तो मिळवायचा मार्ग सांगा. मला सन्मार्ग दाखवा !

प्रपंचाची सोनेरी स्वप्ने पाहण्याच्या वयांत तो युवक परमार्थाची इच्छा मनांत बाळगून आला होता. गुरूना अपार संतोष झाला. तेथे पडलेली एक मोठी शिळा दाखवून गुरू म्हणाले, '' तूं हा दगड घडवीत रहा. तुला निर्वाण लाभेल. ''

युवकाने मोठ्या श्रद्धेने हातांत छन्नी आणि हातोडा घेऊन तो दगड घडवायला सुरूवात केली. दिवसामागून दिवस गेले - महिने गेले, वर्षेही उलटली. गुरूने सांगितलेल्या कार्यांत तो युवक स्वतःलाच विसरून गेला.

एक दिवस त्या दगडामध्ये बुद्धाची प्रतिमा साकारली. त्या युवकाच्या मनांत ही बुद्धाचा प्रकाश भरून राहिला. आंत - बाहेर बुद्धच बुद्ध ! युवकाला निर्वाण प्राप्त झाले होते.

भक्तियोग फलकारी होण्यास - परमशांती मिळविण्यास अमूकच कार्य केले पाहिजे असे नव्हे. संत - शरण सर्व कार्ये देवाचे कार्य समजूनच करतात. त्यांनी गांवाचे कपडे धुतले, बांबूच्या टोपल्या विणल्या, गुरे राखली, लाकडे फोडली. जीवनावश्यक कोणत्याही कामाला त्यांनी तुच्छ मानले नाही. त्यामुळे त्यांनी भक्तीभावाने केलेली सर्व कार्ये - सत्कार्ये- कायक होत ! तोच कैलास !

अशा रीतीने सद्गुरूनी दिलेल्या ज्ञानाच्या महाप्रकाशांत शिवकर्मे - सत्कर्मे करणे - सन्मार्गात चालणे हीच भक्ति ! हेच प्रकाशमय जीवन होय !



# २०.

# विषय रसत्याग

ज्या वस्तूवर आपण प्रेम करतो, ती वस्तु आपल्या डोळ्यांना दिसण्याइतकी स्पष्ट असावी. भौतिक रूपाने बौद्धिक रूपाने अथवा भावनात्मक रूपाने असली तरी ती वस्तु आपणांस प्रत्यक्ष व्हावी, अनुभवतां यावी. तेंव्हा आपल्या मनांत प्रीती उत्पन्न होते. परमानंद प्राप्त होतो.

आपण सर्वजण या फुलावर  प्रेम करतो.ते फुल आपल्या पंचेद्रिंयाना गोचर ! संशयातीत ! स्पष्ट! त्याप्रमाणे परम प्रेमाला भक्ती पात्र असे सत्य तत्वही आम्हांला स्पष्टपणे गोचर व्हायला हवे. त्या परम सत्याचे भावनात्मक, वैचारिक चित्र जेवढे स्पष्ट असेल; तितकी आपली भक्ति दृढ होते.

ऋषीने चंद्रोदय पाहिला. केवढा अद्‌भुत रम्य प्रकाश तो! दुधाहून धवल - शुभ्र - स्निग्ध - मधुर - शितलता त्या चंद्रप्रकाशांत ! अंधाराला सुद्धां न दुखविणारा सौम्य प्रकाश तो. समस्त सृष्टीला विश्रांती देणारा अंधार ही असावा, त्या बरोबरच आनंदाचा प्रकाशसुद्धा पसरावा हेच तर चंद्रप्रकाशाचे वैशिष्ट्य !

प्रकाशाने भरलेला तो नीरव अंधार...... प्रशांत निसर्ग .... स्वर्ग... त्या अमृताच्या सेवनाने आनंदित झाला ऋषी. अंतर्मुखी झाला. निमग्न झाला. त्याच क्षणी सृष्टी - सौंदर्यामागील महासत्य त्याला समजले.

'' सत्यं – ज्ञानं अनंतं ब्रह्म ''

असे उद्‌गार त्याच्या तोंडून आपोआप बाहेर पडले. तीच त्याच्या तोंडून बाहेर पडलेली साम संहिता झाली. तोच सुज्ञान सागर झाला. ऋषि परवस्तूविषयी म्हणाले,

सः भूमिं विश्वतो वृत्वा अत्यतिष्ठद्दशांगुलं

परवस्तु – परमात्मा विश्वाच्या दहा दिशांना पसरून त्याही पलीकडे अनंत होऊन साऱ्या विश्वाला व्यापून राहिला आहे.

ऋषीने एकदां विश्वाकडे पाहिले. तेथे भरून राहिलेल्या सृष्टी सौंदर्याला पाहून '' **परमात्मा विश्व भरीत आहे** '' असे त्यांनी म्हटले.

एकदां ध्यानस्थ होऊन आपल्या अंतरंगी ज्ञानाचे डोळे उघडून पाहिले. तेथे कोटी कोटी सूर्यांहून अधिक चित्प्रभा त्याने पाहिली. तेव्हां तो म्हणाला '' ''**परमात्मा विश्वातीत आहे.** '' शिवशरणांनी सुद्धा तोच अनुभव घेतला. महात्मा बसवेश्वर म्हणतात –

**जगदगल, मुगिलगल मिगेयगल निम्मगल**
**पाताळदिंदत्तत्त निम्म श्रीचरण**
**ब्रह्मांडदिंदत्तत्त निम्म श्रीमुकुट !**
**अप्रमाण, अगम्य अगोचर अप्रतिम लिंगवे,**
**कूडल संगम देवय्या**
**एन्न करस्थलक्के बंदु चुळूकादिरय्या !**

(जगा एवढे,आकाशा एवढे, त्या सर्वांहून पलीकडे, तुमच्या एवढे, पाताळाहून पलिकडे तुमचे श्रीचरण, ब्रह्मांडाच्या पलिकडे तुमचा श्री मुकूट ! अप्रमाण, अगम्य, अगोचर,अप्रतिम लिंगच कूडल संगम देवा.

माझी पूजा स्विकारण्यासाठी, तुम्ही माझ्या करस्थलीं येऊन इवलेसे रूप धारण केले ना ?)

असे ऋषीमुनी, संत,शरण परवस्तूला पाहून ह्रदय भरून त्याचे स्तोत्र करतात. या वचनांना उपनिषदांएवढेच महत्त्व प्राप्त झाले. आत्मानंदाचा सागरच जणूं या संत - वाणींत भरून राहिला. संतांचे ह `बोल त्यांच्या स्वानुभवाचे ! केवळ शाब्दिक तर्क ज्ञान नव्हे.

वस्तु जेव्हां दिसत नाही; तेव्हां तर्क ! विश्वभरित, विश्वातीत अशा वस्तूला ऋषीने प्रत्यक्ष पाहिले. अनुभवले ! त्यामुळे त्याला तर्काचा प्रश्नच नव्हता. सत्य हे तर्काला कधीच गवसत नाही.

**''नैषा तर्केण मतिरापनेया !''**

ऋषींनी जसे आपल्या अंतरंगाची कवाडे उघडून सत्य दर्शन घेतले तसे आपण करूं शकत नाही. सत्याविषयी शेकडो तर्क करून शब्द जालच आपण निर्माण केले. त्याच शब्दजालांत सापडून आपण म्हटले,

'शास्त्रजालं महारण्यं चित्तविभ्रमण कारणं ।'

त्या शुष्क शब्दांशी खटाटोप करून त्या शास्त्रजालांतून मुक्त झाले ते परमाचार्य, परमानुभवि ! शेवटी

' निश्शब्दं ब्रह्ममुच्यते'

असा सत्याचा उद्घोष केला. बुध्दिभ्रम उत्पन्न करणाऱ्या महाअरण्य स्वरूप अशा शब्दजालांतून त्यांनी अनुभव घेतलेल्या त्या परम सत्यावर परिशुध्द प्रेम केले तर परमानंद प्राप्ति होते. ती खरी

भक्ति होय ! अशा भक्तीच्या पोषणेला सत्संग, स्मरणसंग, सत्कार्य आवश्यक ! हे आपण आतापर्यंत जाणले. आतां सत्कार्य करून सुध्दां आपण कसे रहावे ? हे जाणून-घेऊंया !

कूर्वन्नेवेह कर्माणि जिजिविषेच्छतं समाः ।
एवं त्वयि नान्यथेतो ऽ स्ति न कर्म लिप्यते नरे ॥

ईशावास्य उपनिषद.२

( शास्त्रविहीत कर्म करीत या जगांत शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी. अशा रीतीने त्यागभावनेने केलेले कर्म, हे मनुष्या तुला लिप्त होत नाही.)

तूं शंभर वर्षे सत्कार्य कर ! पण ते कर्म त्याग भावनेने करावे. देवाला समर्पित होऊन निष्काम कर्म करावे. त्या कर्मांमध्ये आपण गुंतू नये !

हे सकल जग परमात्म्याच्या कृपेने, त्याच्या दयेने अस्तित्वांत आहे. ही देवाची अद्‌भुतरम्य कृति ! आपण या जगावर प्रेम करावे. त्यासाठी आयुष्यभरं राबावे. धन-धान्य, संपत्ति सत्य शुध्द मार्गाने मिळवावी. स्व-पर हितासाठी त्याचा विनियोग करावा. पण प्रपंचात कशालाही चिकटून न राहतां निर्लिप्त भावनेने असावे. असे हे निष्काम आणि निर्लिप्त सत्कर्म भक्तीला पोषक आहे. अशी निर्लिप्तता त्यागानेच लाभते !!

त्यागाचे दोन प्रकार. एक विषयत्याग, दुसरा प्रकार म्हणजे विषय रसत्याग ! ज्या वस्तूंमुळे आपल्या भक्तिसाधनेला अडथळा येतो, अशा वस्तूंपासून आपण दूर रहावे. हा विषय त्याग ! प्रत्यक्ष विषयांचा त्याग केला तरी त्या विषय वस्तूंचे स्मरण आपणांस त्रास देते असते. हीच

विषय वासना अथवा विषय रस होय ! त्या वस्तूंचे स्मरण, त्यावरील आसक्ति सोडून देणे हाच विषय रस त्याग होय ! तोंटद सिध्दलिंग स्वामी महाराज म्हणतात -

हेणन कंडरे नायि कच्चिदल्लदे मांबुदे ?
हणव कंडरे मन करगिदल्लदे मांबुदे ?
बिसिय कंडरे बेण्णे करगिदल्लदे मांबुदे ?
हुसिय कंडरे लोक मेच्चुवुदु, नच्चुवुदु
महालिंग गुरू शिव सिध्देश्वर प्रभुवे !

( मढे पाहिल्यानंतर कुत्रा त्या मढ्याला चावल्याशिवाय राहिल काय ? धन पाहिल्यानंतर मन विरघळल्याशिवाय राहिल काय ? आगीपाशी लोणी ठेवल्यानंतर लोणी विरघळल्याशिवाय राहिल काय ? चंचल मन विषयांकडे आकर्षित झाल्याशिवाय राहिल काय ? )

विषय वस्तु पाहतांच त्या वस्तूचे आकर्षण वाटणे स्वाभाविक होय ! स्वतःला विरक्त म्हणवून घेणारे लोक सुध्दां धनाच्या लोभातून सुटले नाहीत. आगीपुढे लोणी जसे स्वभावतः विरघळते तसा माणूस सुध्दा विषय वस्तूंकडे स्वभावतः ओढला जातो.

परमसत्य - परमात्म प्राप्ति करून घेऊन मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूने विषय वस्तूंपासून दैहिक रीतीने दूर रहावे व विषय वस्तूंवरील आसक्तीपासून मानसिक रीतीने दूर रहावे. विषय वस्तूंपासून केवळ आपण दैहिक रीतीने दूर राहून भागत नाही. त्यांची आसक्ति सुटली तरच मन शांत असते. विषय वस्तु बाहेरून जेवढ्या त्रासदायक त्याहून अधिक त्यांची आठवण अधिक तापदायक. आपल्या मनांतील

विषयवस्तूंची आसक्ति दूर करणे तेवढे सोपे नव्हे.

एक होते रस्त्यावरील मोकाट कुत्र्याचे पिलू. नासके कुजके अन्न हिंडून खात ते कसेतरी जगत होते. एकदा एका श्रीमंत माणसाने ते गोंडस कुत्र्याचे पिलू पाहिले. त्या कुत्र्याचे दैव उघडले. त्या श्रीमंताने आपल्या बंगल्यात त्या पिलाला नेले. एक छोटसे घर त्या पिलासाठी निर्मिले. नानाप्रकारच्या खाद्य पदार्थांची रेलचेल होती. अत्यंत सुखासीन जीवन होते त्या पिलाचे.

त्या पिलाला एक स्वप्न पडले. स्वप्नांत देव प्रत्यक्ष समोर उभा राहिला, '' अरे पिला, तूं सुखात आहेस ना? तुझे हे राजवैभव पाहून मला फ़ारच संतोष झाला आहे. तुला आणखी काहीं हवे असेल तर मागून घे !''

'' देवा, तुझे उपकार फारच थोर ! मला सगळी सुखे मिळत आहेत, पण फार दिवसांपासून मला एक आशा झाली आहे. '' कुत्र्याचे पिलू म्हणाले.

'' सांग ! तुझी आशा काय आहे? '' देव म्हणाला, ''संकोच करूं नकोस ! बिनधास्तपणे माग काय हवे आहे तुला ? ''

कृमिकुलचित्तं लाला क्लिन्नं वर्णरहितं

जिगुप्सितं नरास्ति नीरसं अरूपं ।

वर्णरहित, नीरस, कुरूप, किड्यांनी भरलेले, दुर्गंधाने भरलेले, असह्य असे वाळलेले हाडुक मागितले त्या कुत्र्याच्या पिलाने !

राज वैभवात लोळणाऱ्या कुत्र्याच्या पिलाला वाळलेल्या दुर्गंधित

हाडाचा मोह सुटला नव्हता. विषय वासना इतकी बलिष्ठ ! या विषय रस त्यागाविषयी गीतेत एक श्लोक असा -

विषया विनिवर्तंते निराहारंस्य देहिनः
रसवर्ज्यं रसोप्यस्य परंदृष्ट्वा निवर्तंते । गीता २ - ५९.

आहार निग्रहाने जीवाच्या विषय भोगाचे बळ, दैहिक शक्ति क्षीण होते. पण भोगेच्छा, मानसिक ओढ क्षीण होत नाही. परम सत्य वस्तूच्या दर्शनानेच विषय वासनेचा निग्रह करणे साध्य होते.

चिंचेच्या झाडाखाली बसलेले असतां तोंडला पाणी सुटल्याविना राहील काय ? नाना प्रकारच्या सुख - विलासी वस्तूंनी भरलेल्या दुकानांत आपण गेलो असतां आवश्यकता नसतांना सुध्दा कांहीतरी खरेदी करावी असे वाटत नाही काय? विषय वस्तूंचे सामिप्य इतके शक्तिशाली असते. म्हणूनच साधकाने विषयांपासून सावध असावे. ''माझा निग्रह फारच कठोर आहे. मी फारच वैराग्यशाली आहे.'' असा अभिमान धरून विषयांबरोबर स्पर्ध्देला उतरूं नये. मी-मी म्हणणारे सुध्दां विषय वासनेला बळी पडले नाहीत काय ?

घरांतील भांडणतंटा - कोपताप देवघरांत नसतो. मठ-मंदिरात, तीर्थ-क्षेत्रांतील पवित्र परिसरांत संसाराचा जंजाळ नसतो. अशा निर्मल परिसरांत राहून भक्ति साधकाने विषय आणि विषयरस त्याग साधावा !



# २१

# भवमाला

भौतिक वस्तूंविषयी वाटणारे प्रेम; हे सामान्य प्रेम ! अभौतिक सत्य वस्तूंविषयी प्रेम; हे परम-प्रेम! तीच भक्ति ! सामान्य प्रेम माणसाला बांधते. परमप्रेम माणसाला बंधनातून मुक्त करते.

सामान्य प्रेमाने विषय रस वाढतो. परम प्रेमाने त्याचा क्षय होतो. प्रापंचिक विषयांची इच्छा, संग, सुख ज्यामुळे उत्पन्न होते, तो रस होय ! त्यामुळे भवबंधन !

अरगिन पुत्थळियनुरि कोंडडे उदक बायारिबळलुत्तिदे !
अगेयिं भो बावियनगेयिं भो !
बावियनगेदात सत्त, बावि बत्तितु - इदु कारण
नेरे  मुरू लोक बरूसूरेवोयित्तु, गुहेश्वरा !

- अल्लमप्रभु

( लाखेच्या पुतळ्याला आग लागली आणि पाणी तहानेने व्याकुळ झाले. विहीर खणा ! विहीर खणणारा मेला ! तिन्ही लोक याच्या मागे जाऊन नाश पावले ! )

प्रापंचिक विषय रस माणसाला कसा बांधून टाकतो; हे अलमप्रभूनी या वचनांत सांगितले आहे. या वचनांतील एकेका चरणांची चर्चा करूंया !

अरगिन पुत्थळियनुरि कोंडडे.

लाखेच्या पुतळ्याला आग लागली.....

हा देह म्हणजे लाखेचा पुतळा. सृष्टीचे सारे सौंदर्य एकवटून मनुष्य देह झाला. रामायण,महाभारत इत्यादि महान ग्रंथ आदि करून जगांतील सर्व इतिहास या देहावरच लिहिला गेला. विज्ञान, आत्मज्ञान, सकलशास्त्र, वेद, पुराण हे सर्व देहाभोवतीच फिरत राहिले.

देवाधिदेव सुध्दा मानव देहाच्या सौंदर्यावर मोहित झाले. मानवी सौंदर्याविषयी देवांना सुध्दा मत्सर वाटला. अशा या देहाला जन्मतां क्षणीच काळाचा अग्नि लागला आहे. हा लाखेचा देह क्षणा-क्षणाला विरघळतो आहे. एक दिवस हा देह पूर्णपणे विरघळून जाईल. नाहीसा होईल !

हा देह कितीही सुंदर असला तरी काळाच्या तावडींतून त्याची सुटका होत नाही. हा देह नष्ट होण्याच्या मार्गावर आहे. म्हणूनच या देहाला अनुलक्षून अल्लमप्रभु म्हणतात लाखेच्या पुतळ्याला आग लागली !

उदक बायारि बळ्लुत्तिदे.

पाण्याला तहान लागून तळमळते.

या देहांतील मन म्हणजेच उदक अथवा पाणी. पाण्या प्रमाणेच मन ही चंचल ! त्याला निश्चित रूप नाही. आकार नाही. इकडून तिकडे भरकटते; उगाच ! मनाच्या चंचलतेमुळे माणसाला फारच त्रास होतो. जीव कासावीस होतो. तळमळतो.

सगळ्या जगाची तहान भागविणाऱ्या पाण्यालाच तहान लागली तर काय होईल ? सप्त सागरांतील पाणी ओतून सुध्दां ही तहान भागणार नाही. मन प्रसन्न असेल तरच जीवनांत सुख आणि शांति लाभेल. मनच अप्रसन्न झाले तर काय करायचे ? आशा - इच्छा यांच्या पाशात बध्द झाले तर काय परिणाम होईल ? जीवनभर माणसाला तळमळत रहावे लागेल.

अगेयिं भो बावि अगेयिं भो

विहीर खोदा हो, विहीर खोदा !

मानवाच्या मनाच्या तृष्णेला शांत करणे - तहान भागविणे देवाला सुध्दा शक्य झाले नाही. देवाने इतकी सुंदर, संपन्न सृष्टि मानवाला दिली तरी त्याला तृप्ति नाही. त्याच्या आशा - त्याची तहान शांत झाली नाही. तरी पण मानव आपल्या मनाची तहान भागविण्याचे स्वप्न पाहतो. त्यासाठी प्रयत्न करतो. धडपडतो. रस रूपी विहीर खोदत जातो. पण त्याला संतृप्ति लाभत नाही. जीवनाच्या अंतापर्यंत तो विहीर खणतच राहतो.

मानवाचा हा व्यर्थ प्रयास पाहून आत्मज्ञानी अल्लमप्रभु म्हणतात -

'' विहीर खोदा हो विहीर खोदा ! ''

अगेदात सत्त बावि बत्तित्तु !

खोदणारा मेला ! विहीर आटली !

मनाची तहान कधीही न भागणारी. कधीही तृप्त न होणारी मनाची तृष्णा शांत करण्याच्या प्रयत्नांत आयुष्यभर इंद्रिय सुखाची विहीर खोदत

राहतो माणूस ! खोदतां खोदतां शेवटचा श्वास घेतो. देह पडतो. देहाबरोबरच इंद्रियसुखाच्या विहीरीसुध्दा आटून जातात.

इदु कारण नेरे मूरू लोकवेल्ला !

यासाठी त्रैलोक्यांतील सकल जन नाश पावले. ही केवळ एका लोकाची कथा नव्हे. देवलोक, भूलोक, पाताळलोक हे तीन्ही लोक विषयरूपी विहीर खोदतच नष्ट झाले.

भागवताच्या ययाति गाथेमध्ये व्यास महर्षि विषयवासने विषयी एक सत्य सांगतात.

'' जगांतील सर्व धन-धान्य, माणिक-मोती, सोने-चांदी वस्त्र-वाहने वनिता एकाच माणसाला देऊन टाकल्या तरी त्याची तृष्णा कधीच शांत होत नाही.''

विषय रस इतका सूक्ष्म ! इतका शक्तिशाली असतो. मनुष्य कोठेही गेला, त्याने कांही केले तरी विषयवासना त्याची पाठ सोडत नाही.

एक गृहस्थ होता.तरूण वय ! सुंदर पत्नि ! घरांत कशाचीही कमतरता नव्हती. मोहाच्या प्रपंचात संपूर्णपणे बुडून गेला होता.

त्या गांवी बुध्दाचा परमशिष्य उपगुप्त आला. गांवाबाहेर आम्रवनांत उपगुप्ताने उपदेश केला. परम शांतीचा संदेश दिला.

बुध्दानंतर प्रभावि गुरू उपगुप्त. त्याच्या परम प्रेमाच्या वाणीत तो तरूण गृहस्थ तल्लीन झाला. त्याचे हृदय परिर्वतन घडले. घरी जाऊन तो आपल्या पत्नीला म्हणाला,

''मी आतां उपगुप्ताचे अनुसरण करणार आहे. त्यासाठी मी घर-दार सोडून जाणार आहे. यावर तुझे म्हणणे काय आहे ? ''

त्या तरूणाचे बोलणे ऐकून त्याच्या पत्नीला फारच आश्चर्य वाटले. ती धैर्याने म्हणाली,'' प्रपंचाचा त्याग करून - घरदार सोडून जाणे केवळ बुध्दालाच शक्य झाले. सर्वांना ते साध्य नाही ! आपण पुनः एकदां विचार करुन पहावे.''

नवरा हट्टाला पडला, म्हणाला, ''ते कसे साध्य नाही ? पाहतोच मी !''

''ठीक आहे !'' पत्नी म्हणाली, '' जाणार असाल तर खुशाल जा. मी तुम्हाला अडवीत नाही. पण जाताना माझी छोटीशी भेट स्वीकार करा !''

'' तूं मला घर सोडायला संमति देतेस ना ? तर मग तुला जे कांही द्यायचे ते दे ! मी घेऊन जाईन. ''तरुण म्हणाला.

'' माझ्या गळ्यांतील ही मण्याची माळ तुम्हीच तर मला प्रेमाने दिली होती. ती नित्य गळ्यांत घालावी. व या माळेनेच जप करावा ! '' असे म्हणून पत्नीने ती माळ तरूणाला दिली व नमस्कार केला.

आपल्या पत्नीला आपणच प्रेमाची भेट म्हणून दिलेली ती माळ आपल्या गळ्यांत घालून घेऊन तो तरूण हिमालयांत गेला. ती माळ हाती धरून तो तपश्चर्येला बसला. दहा बारा वर्षे लोटली तरी त्याला शांति-समाधान लाभेना. जप करायला बसला की ती जपमाला म्हणायची, ''मी कोणाच्या गळ्यांत होते माहीत आहे कां?'' असा

त्याला भास होई! पत्नीचे ते सुंदर मुख ! तिचा सुंदर गळा ! गळ्यांत रूद्राक्षमाळ घातलेला तो सुंदर प्रसंग ! सर्व कांही त्याचे नजरेसमोर उभे राही.

'बुध्दं सरणं गच्छामि .......संघं ......''

लक्ष-लक्ष जप तरुणाने केला. पण जपमाला हातांत धरतांच त्याला आपल्या पत्नीची आठवण होई ! तोच चित्र-विचित्र अनुभव !

एकदां रात्रीच्या वेळी पांढरे शुभ्र चांदणे पसरले होते. त्या तरुणाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. हातांत जपमाला !

'' माझी साधना फलकारी झाली नाही. चित्त स्थिर झाले नाही. सत्य-साक्षात्कार घडला नाही. !'' याचे दुःख झाले होते तरुणाला.

त्या चांदण्यारात्री जप करायचे सोडून रडत बसलेल्या आपल्या तरूण शिष्याला गुरू उपगुप्ताने पाहिले. त्याच्या जवळ जाऊन प्रेमाने पाठीवर हात फिरवीत उपगुप्त म्हणाला, ''तुझ्या डोळ्यांत अश्रु कां बरे ?''

शिष्याने आपली सर्व हकीकत गुरूला सांगितली.

''ही जपमाला तुझ्या साधनेत बाधक असेल तर तूं ती माळ कां बरे हाती धरतोस ? टाकून दे ! '' गुरु म्हणाला.

'' गुरूदेव, ही जपमाला टाकून देणे येवढे सोपे आहे काय?'' शिष्याने विचारले.

'' कां बरें सोपे नाही?'' गुरूने विचारले.

'' मी ही माळ टाकून देणार नाही, असे माझ्या पत्नीला मी वचन दिले आहे ! '' शिष्य म्हणाला.

'' अस्सं काय ?'' गुरू म्हणाला, ''उपदेश घेतांना बुध्द-धर्म आणि संघ या व्यतिरिक्त अन्य कांहीही धरत नाही अशी प्रतिज्ञा तूं केली होती ना ?''

''होय ! गुरुदेव मी विसरलो होतो !'' शिष्य म्हणाला.

''तुला उपदेशाचा विसर पाडणारी ही माळच ! ही केवळ जपमाला नव्हे ! या मध्ये तुझा सर्व प्रपंच भरलेला आहे. ही जपमाला आधी फेकून दे पाहूं ! '' गुरू म्हणाले.

'' गुरूदेव, मला क्षमा करा ! ही जपमाला टाकून देणे, माझ्याने होणार नाही. ही जपमाला सोडून द्यावीच लागली तर, घरी जाऊन ही परत देऊन येतो !'' शिष्य म्हणाला.

ती जपमाला आपल्या पत्नीला परत द्यायला गेलेला तो तरुण पुनः गुरुकडे येऊं शकेल काय ?

ती जपमाला म्हणजेच त्या युवकाला भवमाला झाली. विषय स्मरणाची माला झाली. कधीही न सुटणाऱ्या मायेची माला ती ! त्या मोहाच्या माळेत ओवलेला दोरा कोणता होता ? तोच विषय रसाचा दोरा ! या विषयरसामुळेच भक्ति, ज्ञान, सुकर्म हे सर्व आपणापासून दूर-दूर जात आहेत. आपण भवबंधनात बध्द होतो आहोत. आम्हांला भवबंधनात गुंतवून गंमत पाहणाऱ्या 'विषय रसा'ची महिमा किती सांगावी ?

दूर-दूरच्या उंचच उंच पर्वत शिखरावर आपण जातो. सभोवती विशाल आकाश - दिगंतापर्यंत सभोवती पसरलेले मैदान. आपण डोळे मिटून बसतो. क्षणकाल सर्व अदृश्य होते. केवळ शून्य ! दुसऱ्याच क्षणी आपणास आपल्या घराची ती लहानशी खोली दिसूं लागते. आपले मन तिकडे धावू लागते. समस्त प्रपंचाच्या स्मरणाची माळ करून आपल्या गळ्यांत घालते. आनंदाने टाळ्या पिटून नाचूं लागते.

असे असतां आपली जपमाला किती मोजली तरी काय झाले ? मोजतां मोजतां बाहेर हाताची बोटे आणि माळेचे मणी झिजतात.मनांत आठवणीचे मणि आणखी पुष्ट होतात !

ही भवमाला एका क्षणांत तुटणारी नव्हे. किती जन्मामध्ये ही माळ फिरवीत आलो आपण ? बापासारखा मुलगा, मुलासारखा बाप ! बंधुबांधव सगळेच्या सगळे तीच भवमाला फिरवणारे. जोपर्यंत जगले तोपर्यंत सर्वजण जे काही पूर्वापार करत आले; तेच करीत भवमालेला मजबूत बनवीत आले. अशारीतीने जन्मोजन्मी ही भवमाला आपणास वारसा म्हणून मिळाली आहे.

निरंतर साधनेने या 'विषयरसाचा ' त्याग करून ही भवमाला तोडून फेकून देणे हीच खरी भक्ति होय !



# २२
# चंद्रगिरी

भावमाधुर्यामुळे अनंत सत्याची अनुभूति उत्पन्न होते. तोच भक्तियोग होय ! या योगामध्ये साधक परम सत्याला प्राणाहून प्रिय मानतो. स्वतःलाच तो समर्पण करतो. ते परम सत्यच आपण होऊन अविरळ आत्मानंद प्राप्त करून घेतो. भक्तियोगाचा जीवच असे जे परम सत्य, त्या परमसत्याचे ज्ञान साधकाला स्पष्टपणे व्हावे लागते. अन्यथा साधना कुंठित होते.

घर-दार वगैरे प्रापंचिक वस्तु आपण पंच ज्ञानेंद्रियांद्वारे जाणतो. हे ऐंद्रिक ज्ञान होय ! या जगामध्ये कांही वस्तु अशा आहेत की त्यांचे ज्ञान आपणास नसते. ज्यांनी त्या वस्तु पाहिल्या आहेत; त्यांच्याबद्दल माहिती मिळवितो. ते शब्दज्ञान होय कोणीही पाहिलेल्या नाहीत अशा कांही वस्तु आपण तर्काने अथवा अनुमानाने जाणतो; ते अनुमान ज्ञान होय !

अनुभवि परमसत्य जाणारे. त्यांचे ज्ञान ऐंद्रिक नव्हे, शाब्दिक नव्हे,तार्किकही नव्हे. ते स्वानुभवजन्य ज्ञान होय ! साधु-संत शिवशरण हे पंडित नव्हेत; शास्त्रपारंगत नव्हेत; विद्वान नव्हेत. ते परमानुभवि होत ! अल्लमप्रभु परम अनुभावि. ग्रंथात वाचून अथवा कोणाचा तरी उपदेश ऐकून त्यांनी परम सत्याचे ज्ञान मिळविले नव्हते. आपल्या निर्मल जीवनांत सहजपणे त्यांना परम सत्याचा - परशिव - परमात्म्याचा अनुभव लाभला होता. ती अनुभूति.

केलवरूकंडेवेंबरू ! केलवरू काणेवेंबरू.

अदेनु तारामंडलवे ? सूर्य मंडलवे ?

गुहेश्वर निप्पुदु चंद्रगिरिय पट्टण नोडा !

(कांहीजण आपण परमसत्याला पाहिले असे म्हणतात. कांहीजण आम्ही परमसत्य पाहिले नाही असे म्हणतात. ते काय तारामंडल की सूर्यमंडल ? गुहेश्वर वास करतो चंद्रगिरि नगरात.)

कांहीजण आपण परम सत्याला पाहिले असे म्हणतात. कांहीजण आपण परम सत्य पाहिले नाही असे म्हणतात. दिवसा तारामंडल दिसत नाही. रात्री सूर्यमंडल दिसत नाही. सत्य दिसण्याला अथवा न दिसण्याला ते काय तारामंडल आहे की सूर्यमंडल आहे ? परम सत्य स्वरूपी गुहेश्वर असतो चंद्रगिरी नगरीत. हा झाला या वचनाचा सामान्य अर्थ ! लौकिक भाषेतला !

योगशास्त्राच्या भाषेत सांगायचे झाल्यास तारामंडल, सूर्यमंडल ही पदे तारक योगात येतात. तारक म्हणजे नाद-बिंदु-कला यांची साधना. केवळ प्रकाश म्हणजे कला. प्रकाश साकार होऊन ज्योतिरूप झाला तर त्याला बिंदु म्हणतात. त्या ज्योतीचे स्पंदन हाच नाद होय !

देह - मन स्थिर करून; प्राणवायूची गति. नियंत्रित करून डोळे मिटून ध्यानाला बसावे. त्यावेळी केवळ भावगत प्रकाश दर्शन झाले तर ते कला दर्शन ! ती कला मूर्त होऊन सूर्य बिंब होऊन दिसली तर ते बिंदु दर्शन होय ! त्या सूर्याची स्पंदने ऐकू आली तर तो नाद होय ! कला - बिंदु - नाद आणि नाद बिंदू - कला हा तारक योगाचा अवरोहण - आरोहण क्रम होय !

या तारक योगाचे साधक नाद - बिंदु - कला यांचे दर्शन घेऊन आपण परम सत्याचेच दर्शन घेतले असे समजतात. अनुभावि संताच्या दृष्टीने अंतिम सत्य हे नाद - बिंदु - कला यांना अतीत असे आहे. तर मग सत्यरूपी सदन कोठे आहे ?

गुहेश्वरनिप्पुदु चंद्रगिरिय पट्टणदल्लि.

गुहेश्वर आहे चंद्रगिरीच्या नगरी !

चंद्र म्हणजे निस्तरंग मन. साधकाचे मन चंद्राप्रमाणे निर्मल, निश्चल असावे. ती अमनस्कावस्था. तेथे भावनातरंग नाहीत. कल्पनांचे जाळे नाही. विचार लहरी नाहीत. बाह्यांतर प्रपंच तेथे नसतो. असते ते निव्वळ अवकाश ! शून्य ! परिशुभ्र, प्रशांत अशा मानस सरोवरांत सत्यरुपी सूर्याचे दर्शन घडते ! गुहेश्वर आहे चंद्रगिरीच्या नगरी याचा हा अर्थ !

ते सत्यसाधकाचे मन. मिथ्यासाधक आम्ही. आमचे मन तसे नाही. सदा भूत-भविष्यांत ते संचार करीत असते. पूर्वीच्या स्मृति, भविष्यांतील कल्पना यांमध्ये ते दोलायमान असते. त्यामुळे आपले मन चंचल ! मलीन !

शेख महम्मदाची कथा फारच उद्‌बोधक आहे. शेख महम्मद डोक्यावर तुपाची घागर वाहून नेण्याचे काम करीत होता. ती घागर ठराविक ठिकाणी पोहोचविल्याने त्याला चार आणे (पंचवीस पैसे) मजूरी मिळायची होती. तेवढ्या आधारावरच त्याच्या कल्पनेचा घोडा भरधाव दौडू लागला.

..... '' या चार आण्यांत एक कोंबडीचे अंडे विकत आणायचे.

त्यातून पिलू बाहेर पडले म्हणजे त्या पिलाची जोपासना करायची. ते पिलू मोठे झाले की भरपूर अंडी देईल. त्या सर्व अंड्यांतून पिले निघाली. ती पिले मोठी झाली की ती सुध्दा अंडी देऊ लागतील. ती विकून मी खूप पैसे कमावेन. मोठा श्रीमंत होईन. मोठा वाडा बांधेन. लग्न करेन. बायको येईल.माझे पाय चेपेल. माझी खुशामत करेल. माझी सासू येईल. माझ्या बायकोला माहेरी पाठविण्यासाठी आग्रह करेल. मी पाठवणार नाही म्हणून स्पष्ट सांगेन.....''

कल्पना लोकांतील सासूला नाही म्हणत असतां वर्तमान काळांत त्याने जोराने मान हालवली. त्या बरोबर तुपाची घागर डोक्यावरून पडली - फुटली. डोक्यांतील भविष्यांतील कल्पना महलसुध्दा कोसळून त्याचे तुकडे तुकडे झाले.

हे मन अति चंचल. ते चंद्रगिरी नव्हे. अंधाराचे साम्राज्य ! तेथे सत्याचा प्रकाश नाही. शांतीची सावली नाही. आनंदाचा अनुभव नाही. सामान्यपणे आपणासर्वांचे मनही तसेच !

कोवळे मूल मातेच्या मांडीवर झोपले आहे. माता दिवास्वप्न पाहते. आपला मुलगा मोठा होईल. तो शाळेला जाईल. कॉलेजात शिकूं लागेल. पुढे मोठा पुढारी होईल. एम. एल. ए. होईल. एम. पी. होईल. देश विदेशांत संचार करेल. त्याची कीर्ति दिगंतात पसरेल !.....

तेवढ्यांत मूल जागे होते. रडूं लागते. माता स्वप्न लोकांतून जागी होऊन इहलोकांत प्रवेश करते.

शेतकरी शेतांत पेरणी करतो. पाऊस पाणी चांगले झालेले असते. शेतांत झाडाखाली बसून तो ही दिवास्वप्न पाहतो.

" यंदा पाऊस चांगला झाला आहे. या पुढची नक्षत्रे सुध्दां दगा देणार नाहीत. भरपूर पीक येईल. हातांत चार पैसे येतील. थोरल्या मुलाचे लग्न तेवढे यंदा उरकून घ्यावे. घरांत सून येईल. आतां बायको थकली. तिच्या हातून काम होईना. घरांत सून आली की गरमागरम जेवण मिळेल. तिच्यावर घरचा कारभार -मुलावर शेताचा कारभार सोपवून आपण पति-पत्नि निश्चिंत राहूं ! असा तो विचार करतो....."

पेरलेले बी अजून उगवायचे असते; हे तो विसरतो.

व्यापारी नवीन दुकान उघडतो. गिऱ्हाईकांची झुंबड उडते. जेवायला सुध्दा सवड नसते. तेवढा व्यापार ! त्याचे मन स्वप्नांत विहार करूं लागते.

" चार पांच वर्षांत भरपूर फायदा होईल. किरकोळ व्यापार सोडून ठोक व्यापार सुरू करेन. गांवातील सर्व माल आपणच खरेदी करूं ! बाजार पेठेवर नियंत्रण ठेवू ! मी सांगेन तो दर देऊन लोक माझ्याकडून माल नेतील. मग मी लक्षाधीश ......नव्हे नव्हे...... कोट्याधीश होईन."

कितीतरी लोकांनी अशी दिवास्वप्ने पाहिली. त्यापैकी किती लोकांची स्वप्ने साकार झाली ?

रामायणांतील एक प्रसंग ! सीतेला रावण पळवून नेतो. राम-लक्ष्मण सीतेला शोधूं लागतात. रानांत सीतेचा एक अलंकार सापडतो. तो पाहून रामाच्या डोळ्यांतून घळाघळा अश्रु प्रवाह सुरू होतो. अवतारी पुरूष श्रीरामाची ही अवस्था. तर मग इतरे जनांची काय वाट ?

'विषय रसाचा त्याग करावा म्हणून आपण शत-प्रयत्न करतो. परिणाम मात्र शून्य ! आपणास हव्या असलेल्या विषय-वस्तु दूर समुद्रांत नेऊन बुडवून टाकल्या तरी त्या वस्तूचा विषय रस आपली

पाठ सोडत नाही.

एखादी वस्तू खावीशी वाटते. ती वस्तु आकंठ खाल्यानंतर नकोशी वाटते. पण पुनः काही वेळाने भूक लागते. पुनः ती खावीशी वाटते.

धूम्रपानाच्या व्यसनातून आपली सुटका करून घेण्याची प्रतिज्ञा कांहीजण करतात. आता उद्यापासून सिगारेट ओढायची नाही असा निश्चय करून रात्री खूप धूम्रपान करून झोपतात. सकाळी उठतांच प्रतिज्ञेचा विसर पडलेला असतो. हात सिगारेटचे पाकिट शोधत असते.

आपण विषयापासून जेवढे दूर-दूर जाण्याचा प्रयत्न करतो; तेवढा तो विषय रस आपल्या मनांत वाढतच जातो. आपण हरतो. राजा भर्तृहरी म्हणतो,

**उन्मत्त प्रेमसंरम्भादारभन्ते यदङ्गना**
**तत्र प्रत्यूह माधातुं ब्रम्हापि खलु कातरः** ।। शृंगारशतकम् ।।६१।।

स्त्रीने उन्मत्तपणे उच्छृंखलपणे प्रणयचेष्टा आरंभली तर त्या पासून स्वतःचा बचाव करणे ब्रम्हदेवाला सुध्दा शक्य होत नाही.

साधकाने विषयांना सामोरे जाऊन त्यांना जिंकण्याचा प्रयत्न कधीही करूं नये ! देवाना सुध्दा हरविणारी ही विषयवासना युक्तीने भगवद्भक्तीने जिंकावी ! विषयवासनेचा त्याग करून निर्मळ , प्रशांत, परिशुध्द झालेले मनच चंद्रगिरी होय ! गुहेश्वर - परमात्मा तेथेच वास करतो.



# २३
# रसमुक्ति

परमेश्वराच्या प्राप्तीसाठी या जगांत अनेक उपासना पद्धति प्रचलित आहेत. त्या सर्व उपासनेंत भक्तियोग हा अत्यंत सरळ, सोपा, सौम्य आणि शांत! भक्तीचे वर्णन शब्दांत करतां येत नाही.

''अध्यात्मामध्ये दोहोंचे वर्णन शब्दांत करता येत नाही. भक्ति आणि परवस्तु! कारण दोन्ही निस्सीम!''

चैतन्य महाप्रभु भक्ति वेदांताचे परमाचार्य! एकजण त्यांच्याकडे आला व म्हणाला ''आपल्या मुखाने भक्तीच्या स्वरूपाविषयी ऐकावे अशी मला इच्छा झाली आहे.''

चैतन्य महाप्रभु म्हणाले ''ते शब्दांत सांगतां येत नाही. सत्याराधनेंत भावनिर्भर असलेल्या भक्ताच्या आनंद बाष्पामध्येंच ते ओळखावे!''

आकाशांतून बरसणाऱ्या पावसाचे वर्णन करतां येईल. पाऊस पडल्यानंतर ठिकठिकाणी साठलेल्या पाण्याविषयी सांगता येईल! नदीच्या रूपाने वाहणाऱ्या पाण्याचे वर्णन करतां येईल. पंण तीच नदी सागराला जाऊन मिळाल्यानंतर त्या सागराचे वर्णन कोणत्या शब्दांत करायचे? ओढे नाले, विहिरी प्रमाणे सीमित असलेल्या मानवाच्या हृद्गत सकल प्रापंचिक भावनांचे वर्णन करतां येणे शक्य आहे. महासागराप्रमाणे असणाऱ्या प्रेमरूपी भक्तीचे वर्णन कसे बरे करतां

येईल ? साधकाने त्या भक्तिसागरांत समरस व्हावे. भगवदानंदाचा अनुभव घ्यावा. तो भगवदानंद कसा असतो? ते सांगता येत नाही.

जसे भक्तीचे वर्णन करतां येत नाही; तसेच त्या परमवस्तूचे सुद्धा वर्णन करतां येत नाही. सामान्य वस्तु परिमित असतात. परवस्तु अपरिमित असते. त्या परवस्तू विषयी आईनस्टाइन म्हणतो, ''सीमा नसलेली परवस्तु अनंत! आणि अव्यक्त ! तीच परवस्तु सृष्टीच्या रूपाने व्यक्त होते. त्या परवस्तूला जाणून, त्याचा अनुभव घेऊन आनंद मिळविणे हेच मानवाचे कर्तव्य होय!''

परवस्तूचा अनुभव घ्यायचा असल्यास आपल्या ठिकाणी त्या परवस्तूविषयी प्रेम असावे. तीच भक्ति! ती भक्ति साध्य व्हायची असेल तर आपण प्रापंचिक विषय, विषयरस त्याग केला पाहिजे. विषयरस त्याग म्हणजे लालसेचा त्याग! हीच रसमुक्ति होय! आपण विषयत्याग करूं शकू! आपण विषयत्याग केला नाही तरी तो होतोच! जस जसे कालचक्र फिरूं लागते, काळाच्या तावडीत आपण सापडतो. एकेका विषयाला तो आपणांपासून दूर करूं लागतो. विषयांचा अनुभव घेणारी आपली इंद्रिये दुर्बळ होऊं लागतात. तेव्हां विषय त्याग आपोआप घडतोच. तोंडातील दांत पडले तर चणे-शेंगदाणे खातां येणार नाहीत. ऊस खातां येणार नाही.कडक भाकरी चघळतां येणार नाही. केवळ मुळु मुळु गिळणे तेवढेच घडते. रूची अनुभवणे शक्य होत नाही. डोळे मंद झाले तर टी.व्ही पाहतां येत नाही. कान मंद झाले तर संगीत श्रवणाचा आनंद अनुभवतां येत नाही.

आपण विषयांचा त्याग केला नाही तरी विषयांची आठवण-आवड, रूप-रस आपणांपाशी शिल्लक असते. सतत प्रयत्न करून

आपण या विषय रसाचा त्याग केला पाहिजे. तेव्हां भक्तियोग सुगम होतो. त्यासाठी सत्संग, सत्यश्रवण, सत्कार्य सहायकारी होतात हे आपण पाहिले. पुष्कळ वेळा एखादी छोटीशी घटना अथवा एखादा शब्दसुद्धा अनेकांना रसमुक्त करायला सहायक झाल्याची उदाहरणे आहेत:

अंगुलीमाल फारच क्रूर दरोडेखोर होता. तो घनदाट अरण्यांत वास करीत असे. दररोज अनेंकाना ठार मारून त्यांची संपत्ति लुटत असे. येवढेच नव्हे तर ज्यांना ज्यांना तो ठार करे त्यांची बोटे छाटून त्यांच्या माळा आपल्या गळ्यांत घालीत असे. ही बोटे नेहमी ताजी असावीत असा त्याचा दंडक होता.

एके दिवशी भगवान बुद्ध अरण्यांतून चालत येत होता. बुद्धाचे पायी चालत येणे अंगुलीमाल आपल्या लालभडक डोळ्यांनी पहात होता. भगवान बुद्ध निर्भयपणे पाउले टाकत धीम्या गतीने चालत होता. समोर साक्षात मृत्युदेवते प्रमाणे उभ्या असलेल्या अंगुलीमालाला पाहून बुद्धाच्या मनांत कसलाही भाव उमटला नाही. निःशून्य मन.... निर्भाव ... भाव !

''थांब कोठे चाललास? थांब'' अंगुलीमालाने गर्जना केली.

''मी सदैव थांबलेलाच आहे. आतां थांबायचे ते मी नव्हे ! तूं ! अंगुलीमाल, तूं. थांब! बुद्ध म्हणाला.

ते ऐकून अंगुलीमाल शाश्वतपणें थांबला. त्याचा देह चालत होता. इंद्रिये चालत होती. अंतरंग मात्र निश्चल झाले होते.

''बुद्धं सरणं गच्छामि! संघं सरणं गच्छामि! असे म्हणत तो बुद्धाला शरण गेला. बुद्ध देवाचा एकच शब्द ''थांब'' येवढा परिणामकारी होता की अंगुलीमाल रसमुक्त झाला होता.

स्वामी रामतीर्थ विदेश प्रवास संपवून परत आल्यावर त्यांच्या पत्नीने विचारले, ''परदेशांत माझी आठवण तुम्हांला होत नाही काय?''

रामतीर्थ म्हणाले, '' तूं माझी आत्माच आहेस. त्यामुळे तुझी आठवण कशी काढायची?''

आत्मदृष्टीने पाहिले तर आपण कोणीही या विश्वापासून भिन्न नव्हे. विश्वाच्या अस्तित्वांत आपले अस्तित्व समरस झाले आहे. त्यामुळे आपण विषयांची आठवण करणे अथवा विसरणे असा प्रश्नच उद्‌भवत नाही. अशी जाणीव असलेल्या आत्मज्ञानी संतांना विषय-रस संग उत्पन्न होत नाही.

अशाप्रकारे विश्वात्मा व माझा आत्मा भिन्न नव्हे हे जाणून विषयरसापासून मुक्त होणे हे स्वामी रामतीर्थांचे रसमुक्ति विधान!

एकदा पंतजल बालक असताना एका पर्वतात ध्यानस्थ बसला होता. सभोवती रमणीय, भव्य सृष्टि पसरलेली. अनंत आकाशांत असंख्य तारा शोभत होत्या. पंतजल आत्माकाशांत ध्यानमग्न झाला होता.

पतंजलाची माता तेथे आली. हळूच स्पर्श करून तिने पतंजलाला ध्यानांतून जागे केले. ध्यानयोगी पतंजल डोळे उघडून पाहतो. मातेला

म्हणतो ''मी आकाश आहे की आकाशच मी आहे हेच समजत नाही. मी कोठे आहे? हेच कळत नाही!''

पंतजल योगी विश्व सत्यामध्ये इतका समाविष्ट होऊन राहिला होता. अशा प्रकारे आंतरंगीकपणे अनंतात समरस होऊन रसत्याग करणे हे दुसरे विधान होय! हे ध्यानयोगी पंतजलाचे रसमुक्ति साधन!

माणूस विषयांच्या भयंकर खोल दरीत कडेवर उभा आहे. कोणत्याही क्षणी त्याचा अध:पात होऊ शकेल. अशावेळी गवताच्या काडीचा आधार लाभतो. तेवढ्याच आधाराने त्याने प्रपंचाच्या या जलप्रपातांत पडणे टाळावे. हे रसमुक्तीचे आणखी एक विधान होय!

अशी अनेक रसमुक्ति विधाने आपण थोर पुरूषांच्या जीवनांत पाहतो. आपल्या सोयीचे एक विधान आचरणांत आणून आपण भक्तिरसाचे सेवन करावे. हाच भक्तियोग होय!



# २४.

# परमाश्रय

तद्वनं नाम तद्वनं इति उपासितव्यं। केनोपनिषत् ४ (६)

'तद्वनं' देवाचे अन्वर्थक नांव! त्या वनाचे वैभव ते काय सांगावे! गगनचुंबी पर्वत शिखरे. आकाशाला भिडणारे उंचच उंच वृक्ष! झुळु झुळु वाहणारे स्फटिक मण्यासारख्या निर्मळ जळांनी युक्त झरे, ओढे, नद्या! खोल दऱ्या! निसर्ग निर्मित प्रशांत गुहा! मधुर फुला फळांनी बहरलेली झाडे झुडपे, मखमली हिरवळ, मधुन मधुन बरसणारा पाऊस, कोवळे ऊन, घन गंभीर असा अंधार! हिम धवल चांदणे! त्या बृहदारण्यांत लहान मोठे पशु, सुंदर पक्षी! वाघा-सिंहासारखे क्रूर प्राणी, हरणांसारखे, सशांसारखे साधु प्राणी, सर्वजण त्या जंगलाच्या आश्रयाने गुण्यागोविंदाने नांदत असतात. जंगल सोडून बाहेर आले कीं त्या पशु-पक्षांना प्राण भय. जंगलात शिरले कीं त्यांना निसर्गाचे सरंक्षण ! अरण्य त्या पशुपक्षांना अभय देते. म्हणूनच ते प्राण्यांचे अभयारण्य !

मानवासकट सर्व प्राणी-जगांतील सर्व जीवराशी ज्याच्या आश्रयाने जगतात ते वन! देवरूपी वन! कोणालाही बरे-वाईट न म्हणतां हा देव वनामध्ये सकल जीवनराशीला जगण्याचा अवकाश देतो. सर्वांना समान रक्षण देतो. या देव वनांत श्रद्धेने असणारा माणूस खरा आनंदी असतो. त्यामुळे ते आनंदवन होय!

वन हे देवाचे केवळ नांवच नव्हे; तर उपनिषद्कालीन ऋषि-मुनींनी देवाला दिलेले लाक्षणिक अभिधान होय! वन म्हणजे आश्रयस्थान! परमात्मा या विश्वाचा परम आश्रय होय. आपण या जगांत सर्व लौकिक आश्रयांचा त्याग करून राहूं शकूं ! पण परमात्मा सोडून एक क्षणभरसुद्धां कोणीही जगूं शकणार नाही. अशा त्या परमात्म्याचे ज्ञान करून देणारा गुरू आपला परमआश्रयच होय. म्हणूनच गुरू सर्वांना समान रूपाने पाहतो. सर्वांवर सारखे प्रेम करतो. सर्वांवर त्याची करूणामयी दृष्टी असते. या जगांत सर्वांना परमाश्रय दोघे. देव आणि देव स्वरूपी गुरू!

स.गरांत जगणाऱ्या मासळीला सागरच आश्रय! मासळी सागरांत जन्मते-जगते-नाहीशी होते. त्या मासळीचे परिशुद्ध जीवन पाहून देवाला त्या मासळीची दया आली. तो मासळीजवळ गेला आणि म्हणाला,

''मी तुझा उद्धार करायला आलो आहे.''

मासळी म्हणाली, ''देवा! मी धन्य झाले. पण उद्धार करणार, म्हणजे काय करणार?''

''तुला स्वर्गात नेऊन सुखांत ठेवणार.'' देव म्हणाला.

''माझे भाग्य थोर म्हणून देवा, तुझी माझ्यावर कृपा झाली.'' मासळी म्हणाली,'' ते असो. तुझ्या स्वर्गात सागर आहे काय?

मासळीच्या ध्यानीं-मनीं-स्वप्नीं सुद्धां सागरच भरून राहिला होता. स्वर्ग-सुखापेक्षा त्या मासळीला सागरच प्राणांहून प्रिय! परमाश्रय!

त्याच प्रमाणें या जीवाला सुद्धा देवच परमाश्रय, परमसंपदा होय!

गुरूसुद्धां देवाप्रमाणे आम्हां सर्वांना परमाश्रयच होय ! गुरु मानवां मानवांमध्ये कोणताही भेदभाव करीत नाही. सर्वांना समान मानून; आत्म ज्ञानाचा बोध करून, त्यांचा उद्धार करतो.

गौतम बुद्धापाशी एक माणूस आला. बुद्धाला वंदन करून तो माणूस म्हणाला, ''महाराज आपण मला आश्रय द्यावा. मी निराश्रित आहे.''

''तथास्तु!'' भगवान बुद्ध म्हणाले, ''तुला आश्रय दिला आहे.''

''पण मी जातीने शूद्र आहे.'' आंगतुक म्हणाला.

''तूं कोणीही असलास तरी हे निर्वाण क्षेत्र आहे.'' बुद्ध म्हणाला.

''हे बुद्धवन आहे. येथे सर्वांना आश्रय आहे!''

हे ऐकून आगंतुकाच्या डोळ्यातून आनंदाश्रु वाहूं लागले. सकल जनांना आश्रय देणारा बुद्ध परमगुरु !

बुद्धाप्रमाणेच बसवेश्वरसुद्धां सकल शरणांना आश्रय देत असत. ''शरणांचे आगमन आम्हांला प्राणांहून प्रिय. जिव्हाळ्याचे !'' असे म्हणत असत. देशाच्या काना कोपऱ्यांतून सर्व वर्गाचे शरण कल्याण येथे जमूं लागले. कोणी ढोर होता! कोणी मांग होता! कोणी परीट होता ... चांभार होता .... शेतकरी होता ..: कोष्टी होता. सर्वजण वेगवेगळे व्यवसाय -उद्योग करीत आपला उदरनिर्वाह करीत. आणि सायंकाळी अनुभव मंटपात जमून भगवंताचा आपणांस कसा कसा अनुभव आला ते वचन रूपांत सांगत. भक्ति मंदिरात सर्वांना मुक्त प्रवेश! सर्वांचे स्वागत!

कल्याण नगरी-बसवकल्याण झाली. शिवकल्याण झाली. ''सकल जीवराशींचे कल्याणच'' या नगरीत होऊ लागले.

साऱ्या जगाला परमआश्रय असा तो देव! त्याचे ज्ञान आपणांस नाही. त्यामुळे आपल्या मनांत व्यर्थ अहंकार-अभिमान उत्पन्न झाला. आपणच श्रेष्ठ हा भाव दृढ झाला. तो भावच भक्तीला आतंककारी! खरे पाहूं जातां या जगात कोण श्रेष्ठ? कोण शक्तिमान?

तो एक विशाल भूप्रदेश. तेथे दुर्वांचे एक रोप सृष्टीदेवाचे स्तोत्र करीत विनयपूर्वक रहात होते.

एके दिवशी वारा ''या जगांत सर्व शक्तिमान मीच'' असे गात शिटी वाजवीत मोठ्या डौलाने वाहात होता. ते ऐकून दुर्वा म्हणाल्या, ''वाऱ्या रे वाऱ्या! या जगांत तुझ्यासारखा शक्तिमान कोणीच नाही काय?''

''कोण आहे माझ्याहून अधिक शक्तिमान?'' वारा गर्वाने म्हणाला. '' मीच सर्वांहून अधिक शक्तिमान आहे.''

''तसे असेल तर तूं माझ्यावर बलप्रयोग करून दाखव ना!'' दुर्वा म्हणाल्या. ''मला समूळ उपटून दाखव! तरच मी तुला सर्वशक्तिमान समजेन अन्यथा नाही.'' दुर्वा म्हणाल्या!

''हा क्षुद्र जीव माझ्याशी वाद घालण्याचे धारिष्ट्य करतो आहे काय?'' वारा म्हणाला. आणि तो जोर जोराने वाहू लागला. वाऱ्याच्या तडाख्यांत मोठे मोठे वृक्ष मुळासकट उन्मळून पडले. धो धो पाऊस पडूं लागला. नदी नाल्यांना महापूर आला. सागरांत लाटांचे तांडवनृत्य

सुरू झाले. सागर किनाऱ्यावरील झाडे उन्मळून पडली. सर्वत्र हा-हाकार माजला. पण दुर्वा मात्र हंसत होत्या.

''मीच शक्तिमान'' असे गर्वाने शिटी घालणारा वारा हरला होता. परमाश्रय अशा परमात्म्यावर विश्वास ठेवणाऱ्या अहंकार रहित दुर्वांचा जय झाला होता.

एक होते गाढव. त्याच्या पाठीवर सोन्याचे रत्नजडित अलंकार लादलेले होते. घोड्याने गाढवाला म्हटले,

''मित्रा, तुझ्या पाठीवर केवढी अमूल्य संपत्ति लादलेली आहे. त्या विषयी तुला थोडासुद्धा आनंद आणि अभिमान नाही. कां बरे?''

गाढव म्हणाले. ''ही संपत्ति माझ्यावर आहे. मी त्या संपत्तीवर नाही. मी त्या संपत्तीला आश्रय आहे. ती संपत्ति मला आश्रय नव्हे. माझ्यावर आश्रित अशा त्या जड संपत्तीचा अभिमान कां बरे धरावा? या संपत्तीचा मालक मीच आहे असे समजणारा मानव. ती संपत्ति त्याच्या हातून दुसऱ्या कोणीतरी हिरावून घेतली तर त्याला किती बरे दुःख होईल? या चिंता चितेची बाधा त्या माणसाला! मला नव्हे. माझ्या पाठीवरील संपत्ति माझ्या दृष्टीने एक जड ओझेच! त्याचा अभिमान - त्याची चिंता मला कशाला?

जगांतील सर्व संपत्ति जरी आपणांस लाभली तरी ती आपल्या आश्रयाने असते. आपण त्या संपत्तीच्या आश्रयाने नसतो. परावलंबी, नश्वर अशा जड संपत्तीचा अभिमान आपण कां बरे धरावा? नित्य निरालंब, जगाचा परमाश्रय अशा देवामध्ये अचल अशी श्रद्धा ठेवून निरहंकारी होऊन असणे, हीच खरी भक्ति होय!

# २५.
# देवकुसुम

भक्ति म्हणजे हृद्गत मधुर भावना. ती सहज,सुंदर! प्रेमाच्या सर्व सीमा नाहीशा झाल्या आणि निस्सीम झाले; तर तेच प्रेम भक्तीमध्ये रूपांतरीत होते. पण प्रेमाला निस्सीम बनविणे वाटते तितके सोपे नव्हे. त्या प्रक्रियेत अनेक अडथळे येतात.

माणसाचे मन फारच विचित्र असते. ते कांही वस्तूंवर गाढ प्रेम करते. तोच राग. कांही वस्तूंचा तिरस्कार करते. तोच द्वेष होय! कांही वस्तूंचा अभिमान धरते. तोच अहंकार! तोच अभिनिवेश. हे सर्व भक्तीच्या मार्गातील अडथळे होत.

धन-संपदा, विद्या-बुद्धि, रूप-यौवन इत्यादि प्रापंचिक वस्तु ! त्यांच्या संगाने मी श्रीमंत, मी विद्यावंत, मी सुरूपी, मी सशक्त असे समजतो. अशा रीतीने बाह्य वस्तूंच्या आश्रयाने आपले व्यक्तित्व निर्माण करतो. 'मी कोण आहे?'' हेच माणूस विसरला आहे.

शॉपेन हॉवर युरोपांतील ज्येष्ठ तत्वज्ञानी. एके दिवशी तो एका बागेमध्यें विचारमग्न होऊन बसला होता. संध्याकाळ झाली. बागेचा माळी त्याच्यापाशी आला. त्याने विचारले,

''केवढा उशीर झालाय! अजून तुम्ही बसून राहिलांत. घरी जायचे नाही काय? कोण तुम्ही?''

''होय! मीही तोच विचार करतो आहे.'' शॉपेन हॉवर म्हणाला.

म्हाताऱ्या माळ्याने अंधुक उजेडांत निरखून पहात म्हटले, असे कां बरे बोलता आहांत ? आपण शॉपेनहॉवर नव्हे काय ?

''होय! त्याबद्दल संशय नको.'' शॉपेन हॉवर म्हणाला, ''पण मी विचार करीत होतो शॉपेन हॉवर विषयी नव्हे. हा शॉपेन हॉवर असे नांव धारण करणारा ''मी कोण आहे?'' याचा मी विचार करीत होतो.''.

शॉपेन हॉवरचे हे उत्तर ऐकून माळी विचारांत पडला!

खरोखर ''मी कोण आहे?'' आपण जाणतच नाही! बाह्य वस्तूंच्या आश्रयावर आपण आपले फसवे व्यक्तित्व निर्माण केले आहे. आपण स्वत:लाच विसरलो आहोत. 'मी कोण आहे?' हे समजल्याशिवाय आपणांला सत्य दर्शन होत नाही..

परमसत्य - परमात्म्याचे - भगवंताचे दर्शन आपणांस कां बरे होत नाही? महाकवि रविंद्रनाथ ठाकूर यांनी एका कवितेंत हृदयस्पर्शी रीतीने सांगितले आहे. त्याचा भाव असा आहे.

''देवा तुझ्या दर्शनासाठी माझे मन आतुर झाले आहे. पण माझा अभिमानच मला अडथळा आणतो आहे. तुला जाणून घ्यायला, तुझ्या पाशी यायला मला प्रतिबंध करतो आहे. तूं कोठे आहेस बरे?

ज्यांच्यापाशी संपत्ति नाही, सामाजिक प्रतिष्ठा नाही, स्थान - मान, मोठेपणा नाही अशा गरीब-दीन-दुबळ्यांच्यापाशी तूं आहेस. ज्यांना धनसंपदा स्थान-मान यांवर आसक्ति नाही - यांचा अभिमान नाही - अशा संतांच्या - शरणांच्या हृदयांत तूं असतोस!

ज्यांच्या अंगावर कपडे नाहीत अशा अर्धनग्र मजूरांच्या बाहूंमध्ये

तूं आहेस! ज्यांना कोणीच बंधु-बांधव नाहीत, त्यांचा तूंच खरा बंधु-बांधव ! तूंच दीन बंधु ! जगाने ज्यांची उपेक्षा केली; त्या उपेक्षितांच्या अंतरंगातच तूं वास करतोस! त्या उपेक्षितांजवळ जाऊन तुला वंदन करावे असे मला वाटते. पण माझी खोटी प्रतिष्ठा, अभिमान मला तुझ्यापाशी सोडत नाहीत !''

या दुराभिमानापासून सुटका करून घेण्याचा एक सुलभ उपाय म्हणजे स्वस्वरूप ज्ञान होय ! अभिमान करणाऱ्या माझ्या स्वरूपाचे ज्ञान आणि माझ्या अभिमानाला कारणीभूत अशा नश्वर प्रापंचिक वस्तूंचे स्वरूप ज्ञान!

थोडासा सारासार विचार केला तरी पुरे! आपल्या अभिमानाचा पाण्याचा बुडबुडा फटकन फुटतो. सभा-समारंभात आपण मुख्य वक्ते असतो. आपला परिचय सभेला करून देतांना, ''यांचा परिचय करून देणे म्हणजे सूर्याचा परिचय करून दिल्यासारखे !'' असे संयोजक म्हणतात. कोटि कोटि वर्षापासून जगाला प्रकाश देणारा तो सूर्य कोठे ? आपल्या पुरता प्रकाशसुद्धा आपणांपाशी नसलेले आपण कोठे? नुकतेच जन्माला येऊन अजून डोळे सुद्धा न उघडलेले आपण कोठे?

आपण संपादन केलेल्या धन संपदेकडे पाहून 'मी श्रीमंत' असा अभिमान बाळगतो. त्या धनाला विचारले की 'हा कोण आहे?'

''मला काय माहीत ?'' म्हणते ते जड धन! ''मी श्रीमंत म्हणणारा अस्तित्वांत आहे किंवा नाही हे मला मुळीच माहीत नाही!''

आपण ते धन कवटाळून आपल्यापाशी ठेवून घेण्याचा खटाटोप करीत असतो. थोडासा हात सैल सोडून पहा; हे धन आपल्या हातांतून

निसटून जाते. अशा अस्थिर प्रापंचिक वस्तू विषयी अभिमान धरणाऱ्यांना भक्ति - मुक्ति कशी लाभेल?

हे जग किती संपन्न आहे! केवढे महासागर! केवढे केवढे उत्तुंग पर्वत! खोल दऱ्याखोरी! संततधार पाऊस. स्वच्छ पाण्याने भरलेली स्फटिकासमान सरोवरे! झुळु झुळु वाहणाऱ्या नद्या! या देवाच्या संपत्तीमधून आपण चंबूभर पाणी मूठभर अन्न दुसऱ्यांना देऊन मोठे दानशूर म्हणवून घेतो. हजारो किलो मिटर अशा विस्तीर्ण जमीनीपैकी टीचभर जमीनीचा तुकडा दान करून आपण स्वत:ला दानशूर कर्ण समजतो. आपल्या या अभिमानाला कांही अर्थ आहे काय?

आपल्या डोळ्यांतील सौंदर्य, मनांतील माधुर्य, बुद्धीतील प्रकाश, प्राणचैतन्य सर्व कांही भगवंताच्या कृपेने आपणांस लाभले. बाहेर जी संपत्ति आहे, पाऊस-पाणी, वारा-प्रकाश - विस्तीर्ण मैदाने, शेतीवाडी, बागबगीचे सर्व कांही त्या परमेश्वराची संपत्ति. अशी आंतरबाह्य सर्व संपत्ति त्या दयाघन देवाचीच. असे असतां आपले असे या जगांत काय आहे ? आपण कशाचा अभिमान धरावा? आणि कां ? शरण देवर दासिमय्या म्हणतात,

**इळे निम्मदान, बेळे निम्मदान**
**सुळिदु बीसुव वायु निम्मदान,**
**निम्मदानवनुंडु अन्यर होगळुव**
**कुन्निगळनेनेंबे, रामनाथा!**

(भूमि तुम्ही दिलेले दान, पीक-धान्य तुमचे दान, वाहणारा वारा, तुमचे दान. तुम्ही दान दिलेल्या सकल वस्तूंचा उपभोग घेऊन अन्य

लोकांची (कृतज्ञता व्यक्त करणाऱ्यांना) स्तुति करणाऱ्या क्षुद्र जनांना काय म्हणावे? रामनाथा)

एक विशाल वृक्ष! हरिव्या गार पानांनी गच्च भरलेला. तेथे एक सुंदर फूल. पिकलेले फळ!

फळ स्वत:शीच म्हणाले, ''मी किती स्वादिष्ट! किती गोड! काय तो माझा रंग! काय ते माझे रूप! माझ्यासारखी रसाळ वस्तु या जगांत दुसरी कोणतीच नसेल.'' फळाने आपली पाठ आपणच थोपटून घेतली.

फूलं म्हणाले, ''माझे रूप, माझा सुगंध, माझा मकरंद या जगात आणखी कोणाला आहे? म्हणूनच मानव असो वा देवता असोत त्यांना मी फारच प्रिय आहे. सर्वजण माझी इच्छा करतात.''

पान म्हणाले, ''माझा हा हिरवा रंग किती मोहक आहे! घराघराला तोरण! नयन मनोहर ! साऱ्या जगाला मीच अलंकार !

पाने, फुले, फळे आपापल्या मोठेपणात मग्न झाली होती. या विशाल जगाकडे, या जगातील अन्य वस्तूंकडे ढुंकूनसुध्दा पहायला ती तयार नव्हती. त्या वृक्षाखाली एक संत बसला होता. तेथे वृक्षाचे मूळ थोडेसे जमीनीच्यावर दिसत होते. त्या मुळाला संताने विचारले, '' तुझ्यावरचे काय म्हणतात ते तूं ऐकलेस काय? ''

'' होय ! ऐकले मी ! मूळ म्हणाले.'' या भव्य वृक्षाला मोठ्या परिश्रमाने पोसून अंगावर धारण करून उभा आहेस तूं. त्याचे ज्ञान नसलेले ते काय वाटेल ते बोलत आहेत. ते सर्व ऐकून ही तूं का बरे उगाच राहिलास ?'' संताने विचारले.

''संत महाराज,'' मूळ म्हणाले, ''त्यांचा स्वभाव वेगळा. माझा स्वभाव वेगळा ! विसरणे आणि गर्व करणे हा त्यांचा स्वभाव. जाणून घेणे व मौन राहणे हा माझा स्वभाव ! हे पान-फूल-फळ अज्ञानामुळे गर्व करतात. पण स्वतःला ज्ञानी असे समजणारा मानवसुध्दा अहंकार करतो ना ! कां बरे?

आमची फुले अंगावर धारण करून आपणच सुंदर असल्याची बढाई मारतो. आमची फळे गोळा करून स्वतःला श्रीमंत समजतो.पूजा -उपासना करताना आमचीच पाने-फुले-फळे देवाला अर्पण करून स्वतःला फारच पुण्यवान समजतो. !'' मुळाचे हे हितवचन ऐकून संत चिंतनात मग्न झाला.

देवालयांत देवापुढे एक लहानशी पणती असते. सभोवती पवित्र प्रकाश पसरवीत असते. पण आलेले सर्व भक्त देवाच्या मूर्तीला अलंकार चढवितात. देवाच्या मूर्तीची पूजा करतात. देवाच्या मूर्तीला आणि देवालयाला प्रकाशमान करणाऱ्या त्या दीपाकडे कोणाचेच लक्ष नसते. दिवा विझला तर देव दिसत नाही कीं देऊळ दिसत नाही. भक्तही दिसत नाही. सर्वांना प्रकाशमान करणारा तो दीप निराभरण, निरहंकारी होय !

या देहामध्ये 'मी' ही एक आत्मज्योति ! त्या आत्मज्योतीच्या प्रकाशांतच मन-बुध्दि, सकल प्रपंच प्रकाशतो. त्या आत्मज्योतीच्या प्रकाशांतच सर्व कांही शोभायमान !! या आत्मज्योतीला जाणले तरच मानवाच्या दुराभिमानाचा काळोख नाहीसा होतो. त्याचे हृदय कमल विकसित होते. पराभक्तीचा परिमळ, सौरभ सर्वत्र पसरतो. हाच

भक्तियोग होय !

येशू, बुध्द, बसव, महावीर वगैरे महात्म्यांच्या उपदेशांत या परम प्रेमाचा सौरभ आपण पाहतो. म्हणूनच या भक्तियोगाचे आचरण करणाऱ्याचे जीवन पावन! त्याचे जीवनरूपी कुसुम देवाच्या शिरी वाहण्यास योग्य ठरते. तेव्हा सर्व भवबंधने गळून पडतात. भक्त भगवदानंदांत समरस होतो ! नित्य मुक्त होतो ! अशारीतीने जीव-कुसुम होते ! हाच भक्तियोग होय !! हाच मुक्तियोग !!



# कन्नड

१. सिध्दांत शिखामणि २५/-
२. श्वेताश्वतरोपनिषत् ४०/-
३. कठोपनिषत् ४०/-
४. केनोपनिषत् ३०/-
५. ईशावास्योपनिषत् २०/-
६. मुंडको पनिषत्
७. मांडुक्योपनिषत् ६५/-
८. परमार्थ गीता प्रवचन
९. पातंजल योग सूत्र ३५/-
१०. योग प्रवेश २/-
११. श्रीमद्‌भगवद्‌गीता २५/-
१२. भगवद्‌गीता चंद्रिका (अध्याय १)
१३. भगवच्चिंतन ४०/-
१४. भक्तियोग
१५. नानारु ?
१६. आनंदयोग
१७. मौन लोकद हाडुगळु
१८. शांतिपथ ४/-
१९. साधना पथ १५/-
२०. सिध्दरामेश्वर वचन-प्रवचन १५/-
२१. सांकेतिक कथेगळु ८/-
२२. समाज संपद हागू इतर प्रबंधगळु
२३. चिंतनेगागि कथेगळु
२४. हठयोग
२५. विश्वद विविध धर्म सूक्तिगळु १-२५
२६. भक्तिगीतामृत
२७. अनुभावामृत
२८. परमानुभवबोधे. ४ संधि
२९. गीता माधुर्य २०/-
३०. गुरूदेव
३१. देवपूजा

# आगामी

१. जीवनयोग
२. गुणसंपदा

# मराठी

१. परमार्थगीता प्रवचने
२. परमानुभव बोधे
३. सिध्दांत शिखामणि
४. कर्मयोगी जीवन
५. भगवच्चिंतन
६. मी कोण आहे?
७. भक्तियोग
८. मौन मनाच्या चांदण्यांत
९. पूजा विधान
१०. सिध्दरामेश्वर वचनांची आंतरदृष्टि

## ENGLISH

1. God world and Soul 15/-
2. Devotional Sayings of Basaweshwara 20/-
3. Songs of Silence 50/-
4. Nijgunas exposition of Spiritual wisdom 40/-
Bhagavacchintan (in press)



## पूज्य श्री. सिध्देश्वर स्वामीजी

विजापूरच्या श्री. ज्ञान योगाश्रमाचे पूज्य श्री. सिध्देश्वर स्वामीजी बालपणींच भगवंताचा शोध घेत लिंगैक्य वेदान्त केसरी श्री. मल्लिकार्जुन शिवयोगीश्वरांच्या सानिध्यांत आले. गुरु सानिध्यांत राहून श्री सिध्देश्वर स्वामीजीनी पाश्चात्य व पौर्वात्य तत्वज्ञानांत एम्. ए. पदवि मिळविली. शिवयोग साधने बरोबरच वेद, आगम, उपनिषदे, योगसूत्र, भगवद्गीता ब्रह्मसूत्र, वचनशास्त्र, इत्यादि धार्मिक ग्रंथांचे सखोल अध्ययन केले.

जगांतील सर्व धर्म ग्रंथांचे सखोल अध्ययन करून सर्व धर्मकेंद्रांशी संपर्क स्थापन केला. गांधीवाद, समाजवाद, लोकशाही, राजेशाही, भांडवलशाही, हुकुमशाही इत्यादि राजकीय व सामाजिक विचारधाराही अवगत करून घेतल्या.

निसर्गाविषयीं भगवंतायेवढीच गाढ श्रध्दा व प्रेम बाळगणारे 'श्री' अत्यंत साधे, निरागस, मधुर स्वभावाचे ! कन्नड, इंग्रजी, मराठी, हिन्दी व संस्कृत आदि भाषांचे प्रकांड पंडित असून कन्नड व इंग्रजी भाषेंत 'श्री' नी अनेक ग्रंथांची रचना केली आहे. जगांतील अनेक देशांमध्ये श्रीं' ची व्याख्याने झाली आहेत. श्रींच्या प्रवचन माधुर्यांत श्रोत्यांना ब्रह्मानंदाचा अनुभव लाभतो.

श्रींच्या अध्यात्म प्रवचनांचे संकलन करून ''भगवच्चिंतन, मी कोण आहे ?'' या ग्रंथांचे प्रकाशन झालेले आहे. सांप्रत 'भक्तियोग' ग्रंथांत श्रींच्यां आध्यात्मिक विचारांचे प्रतिबिंब उमटले आहे.

श्री दुरदुंडीश्वर प्रिंटर्स, संकेश्वर. ☎ : ७३५०४